मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ७७ वें

# ब्रह्मघोळ



( एकांकी विनोदी नाटिका )

: लेखक :

गोपाळ लक्ष्मण आपटे



प्रथमावृत्ति : १५ ऑगस्ट १९५५

किंमत १० आणे

# नांदी



माझ्या ' उपटसुंभ ' या विनोदी नाटिकेच्या लोकप्रियतेवर मी फार खूष आहें. पुण्यांत व पुण्याबाहेर अनेक ठिकाणीं त्या सुटसुटीत एकांकिकेचे अनंत प्रयोग झाले व अजूनही होत आहेत. ' ब्रह्मघोळ ' ही अशीच एक विनोदी नाटिका रसिकांच्या स्वच्छ करमणुकीसाठीं लिहिलेली आहे. त्यांचें दीड दोन तास गंमतीनें मनरंजन करण्याचें गोड काम या नाटिकेच्या प्रयोगानें जरूर होईल. पुण्याच्या प्रसिद्ध ' सोशल् क्लब् ' या हौशी नटांच्या आद्य नाट्यसंस्थेनें या नाटिकेचे रंगपूर्ण प्रयोग केले असून त्यांत श्री. बाबूराव विजापुरे, श्री. अप्पा ताम्हनकर, श्री. बापूराव केळकर, श्री. तात्या मेहेंदळे, कु. सरला गुप्ते व कु. इंदू पाटणकर, या माझ्यावर सतत लोभ करणाऱ्या कलावंतांनीं कामें केलीं आहेत. ही नाटिका 'वाङ्मयशोभे'चे संपादक श्री. मनोहर म. केळकर यांनी आपुलकीनें छापून प्रसिद्ध केल्याबद्दल मी फार आभारी आहें.

१२४४ डेक्कन जिमखाना
रा. ब. आपटे रस्ता
पुणें ४.



— गो. ल. आपटे

चि. प्रदीप बलवंत जोशी,

विजापूर—

या छोट्यास अर्पण

— गो. ल. आपटे.

# ब्रह्मघोळ



| | | |
|---|---|---|
| बाळासाहेब | ... ... ... ... | राजविलास लॉज्‌चे मालक |
| हणमू | ... ... ... ... | नौकर |
| चिऊ | ... ... ... ... | लॉज्‌ची व्यवस्थापिका |
| रा. सा. चंद्रचूड | ... ... ... | पाहुणे |
| तारामती | ... ... ... ... | पाहुण्यांचें कुटुंब |
| सरदार | ... ... ... ... | सज्जन बदमाष |



# ब्रह्मघोळ



[ थोडक्यांत म्हणजे पुणें-मुंबईसारख्या गजबजलेल्या शहरांतील एका 'लॉज्'चें ऑफिस हें या कथानकाचें स्थळ. ऑफिस म्हणजे कांहीं खुर्च्या-बाकें मांडलेलीं. कोपऱ्यांत जबाबदार व्यवस्थापक अगर कधीं कधीं मालक बसण्यासाठीं खास ऑफिस– चेअर, पुढें टेबल. टेबलावर गिऱ्हाइकांचीं नांवें, नातीं, पत्ते वगैरे माहितीचें रजिस्टर. या ऑफिसांतून मागल्या बाजूस जाण्यास एक दरवाजा. या दरवाजांतून मागें ज्या खोलींत जावयाचें ती खास मालकासाठीं राखून ठेवलेली खोली असल्यामुळें अर्थातच 'परवानगीशिवाय आंत जाऊं नये' अशा दरडावणीची पाटी लावलेली स्पष्ट दिसून येते.

टेबलावर संस्थानिकाच्या ऐटीनें पाय पसरून या 'राजविलास लॉज्'चे मालक बाळासाहेब बाळेकुंद्री खुर्चीवर पडल्या पडल्या एक वर्तमानपत्र वाचीत आहेत. फार म्हातारा नाहीं, फार तरुण नाहीं, अशा वयाचे असतात हे मालक. ]

**बाळासाहेब** : (वाचत) 'राजविलास लॉज्' लव्ह गार्डनसमोर अगदीं हमरस्त्यावर. जेवणाची व राहण्याची सरदारी सोय केली जाते. वा: ! छान ! याला म्हणतात जाहिरात. साइज् छोटा पण भपका मोठा ! आमच्या चिऊताईचं डोकं आहे हें किती झालं तरी ! हनुमंता ! ए हणम्या !

**हणमू** : ( प्रवेश करतो. स्वयंपाकघरांत भोजनाच्या पदार्थांपासून तों थेट गिऱ्हाइकांसकट मालकाला बनविण्यापर्यंत तयार असलेला, हेल काढणारा नोकर ) येनरी अप्पा ? काय म्हणतो ?

**बाळासाहेब** : अरे, काय करतो आहेस हणमू ?

**हणमू :** साहेब ! अरे बारा नंबर खोलींत दोड्डू गंमत झाला. तो सिनेमा नटी उतरला. ते खोली. मच्छरदाणींत हे मोठ्ठा चोळ निघाला. गडबड सडबड करूं लागला.

**बाळासाहेब :** अरे बाप रे ! काय म्हणतोस ? विंचू निघाला ?

**हणमू :** हां साहेब. चोळ निघाले. नटी किंचाळले. आमी तडक धांवले. गादींत घुसले. चिमटींत पकडला. नांगी तोडून टाकला. नटी खूप हंसला ! दोड्डू गंमत झाला.

**बाळासाहेब :** चांगला चोळ आहे बाबा तुझा हा ! जा एकदां राऊंड मारून ये सगळ्या खोल्यांवर. कुणाला कुठं काय लागतं आहे पाहून ये. जा. ( हणमू जाऊं लागतो. ) अरे, चिऊआक्का कुठं आहे रे ?

**हणमू :** आक्का ? अंगावर पाणी ओतून घेतो. अंघोळ करतो. आणून सोडूं काय त्याला इथं ?

**बाळासाहेब :** नको. नको. तूं जा. सांगितलेलं काम कर. आमचं आम्ही पाहून घेऊं ( हणमू जातो. बाळासाहेब वर्तमानपत्र-वाचन पुढें चालू करतात.) हं ! हें काय ? " हरवली. आमची पांच वर्षांची, काळीभोर, टपोऱ्या डोळ्यांची, दुभती म्हैस हरवली आहे. आखूडशिंगी असून शेपटीचा गोंडा गुलाबी आहे. एक दांत पडला असून डाव्या डोळ्यांत फूल पडलें आहे. तोंडानें सजनी सजनी अशी हांक मारली कीं लाडानें शेपूट उभारून एकदम जवळ येऊन बिलगते ! सांपडून देणारास रोख शंभर रुपये व एक शेर दूध महिनाभर इनाम दिलें जाईल. मालकानें अगदीं हाय खाल्ली आहे. दाजीबा ढमाले, पाटील, पोस्ट बॉक्स नव्वद."

वा रे वा ढमाले ! अरे, हाय खाण्याऐवजीं थोडी साय कां नाहीं खात ? बायका पळाल्या तर वर्तमानपत्रांत जाहिराती येतात; पण आतां म्हशी पळाल्या तरी जाहिराती द्यायला लागले हे लोक ! नशीब आमचं, या ढमाल्यानं आपल्या लाडक्या म्हशीचा फोटो नाहीं छापलान् ? कमाल आहे बुवा या लोकाची. वर्तमानपत्रांत काय छापावं याला मुळीं ताळतंत्रच उरला नाहीं !

हं ! ही काय भानगड ?

इनाम रुपये एक हजार. " गेल्या आठवड्यांत लष्करांतील सुप्रसिद्ध दडपे, चिकटे ॲन्ड सन्स यांच्या सराफी पेढीवरून वीस हजारांच्या नोटांचें बंडल पळविण्याचा गुन्हा केल्याबद्दल पोलिस खात्याला, नुकताच दहा वर्षांची सजा भोगून सुटलेला अट्टल चोर बंडू चष्मेवाला याचा संशय आहे. त्याच्या हाताची करंगळी मागील एका गुन्ह्याच्या वेळीं झटापटींत तुटलेली आहे. सदरहू गुन्हेगाराचा ठावठिकाणा देणारास मालकानें देऊं केलेले एक हजार रुपयांचें इनाम देण्यांत येईल. "

अस्सं काय ? करंगळी तुटलीय् काय बेट्याची ? वा रे वा बंडू चष्मेवाला ! ...अरे, पण आहे काय हें ? या बातम्या तर मीं कालच वाचल्याचं आठवतंय मला. अन् पुन्हां गुलामांनीं त्याच बातम्या आज परत ठोकून दिल्या अं ? अरे, हे वर्तमानपत्रवाले आम्हांला काय बावळट समजतात कीं काय ?

**हणमू** : ( प्रवेश करून ) साहेब ! तो चौदा लंबर. नवरा-बायको-आट कारटीं. खोबरेल तेल मांगते. डोक्यास चोलून सोडतो म्हणते.

**बाळासाहेब** : खोबऱ्याचं तेल मागतो काय ? नवरा-बायको अन् आठ मुलं नाहीं का ? दहा टाळक्यांना खोबरेल पुरवायला आम्ही किराणा व्यापाऱ्याचे बाप लागून राहिलों आहोंत कीं नाहीं ! त्याला सांग, म्हणावं तुम्हींच आपल्या टाळक्याचा नारळ फोडून, मेंदूच्या खोबऱ्याचं तेल पिळून डोक्यावर चोपडा ! मस्तक शांत होईल चांगलं !

**हणमू** : जाऊन सांगते आमी. जमलं तर नारळ आमीच फोडते. ( जातो. )

**बाळासाहेब** : आक्का ? अहो आक्का ? चिऊताई ?

**चिऊ** : ( प्रवेश करते. दिसण्यांस सुंदर. वयानें अगदीं तरुण. ही बाळासाहेबांची ' फ्रेंड् ' ! लॉजच्या व्यवस्थेची सर्व जबाबदारी पाहणारी व त्या धंद्यांतली त्यांची जवळ जवळ भागीदारीण. ) बाळासाहेब ! आक्का म्हणून मला हांक मारूं नका म्हणून किती वेळां सांगितलं तुम्हांला ?

मला नुसतं चिऊ म्हणून हांक मारा. अहो, चिऊची चव आक्कांत नाहीं येत बाबासाहेब !

**बाळासाहेब :** अग, हें ध्यानांतच राहात नाहीं माझ्या ! काय ठेवायचं म्हणतेस तुझं नांव ?

**चिऊ :** अहो, आतां नांव ठेवायचं का माझं वय आहे ? लोक नावं ठेवतील ना अशानं ? मी आपली साधी चिऊ आहें तीच बरी आहे.

**बाळासाहेब :** वाः रे वाः ! तूं चिऊ चिचुंद्री तर मी बाळासाहेब बाळेकुंद्री !

**हणमू :** ( प्रवेश करून ) येन री ? साहेब. ती चार नंबर. थेरडी. दांतांची कवळी. उंदीर चोरला म्हणतो. फार तक्रार करतो. खाऊ काय बोलतो ?

**चिऊ :** दांतांची कवळी उंदरानं पळवलीन म्हणते ?

**बाळासाहेब :** अरे पण उंदीर तोंडांत कसा शिरला ? तोंड उघडं टाकून निजायचं अन् कवळी उंदरानं चोरली म्हणून शंख करायचा ! बरं तर बरं. दांतांबरोबर उंदरानं जिभेचा गोळा नाहीं पळवलान् कुरतडून ! तरी बाई आपली ढाराढूर !

**चिऊ :** हणमू ! कुठं ठेवली होतीन् कवळी ?

**हणमू :** तोंडाच्या बोळक्यांत रे आक्का ?

**चिऊ :** ( चिडून ) पुन्हा आक्का ?

**हणमू :** ( आर्जवानें ) काय चुकलं आक्का ?

**चिऊ :** वस्ताद आहे मेला पक्का !

**बाळासाहेब :** ( हंसून ) त्याच्यावर कां चिडतेस चिऊ ? आपले ठराव त्या बिचाऱ्याला कसे कळणार ? हणमू, अरे हनुमन्ता ! जा. त्या म्हातारीला म्हणावं कांहीं काळजी करूं नका बरं ! हा राजविलास लॉज् आहे; उंदीर नाहीं. उंदराच्या बापाचे दांत पाडून तुमच्या घशांत घालूं म्हणावं ! जा.

**हणमू :** या भानगडीचा चार्ज काय सांगूं ?

**बाळासाहेब** : हनुमन्ता ! शेपटी फार वर चालली बरं का ? चल जा. पुन्हा हांक मारल्याशिवाय येऊं नको. जा.

**हणमू** : भाळ छलो. ( जातो. )

**बाळासाहेब** : चिऊ ! या दैनिक ' ठणाण ' पत्राला एक पत्र लिहून अंक बंद करायला सांग बघूं अगोदर.

**चिऊ** : अग बाई, तें कां ?

**बाळासाहेब** : अग, सरळ त्याच त्याच बातम्या पुन्हां पुन्हां दडपून छापतात. त्यांना कळलं पाहिजे कीं जग कांहीं दुधखुळं नाहीं एवढं !

**चिऊ** : तीच तीच बातमी !

**बाळासाहेब** : तर ग ! ती म्हशीची अन् हजार रुपये इनामाची बातमी काल धडधडीत वाचल्याचं आठवतं मला. अन् पहावं तर पुन्हां तीच बातमी अगदीं शब्दशः तश्शीच पुन्हां आजच्या अंकांत. पहा तर खरं. ( वर्तमानपत्र तिच्या हातांत देतो. )

**चिऊ** : ( पाहून हंसत ) बाळासाहेब बाळेकुंद्री !

**बाळासाहेब** : काय ग चिऊ चिचुंद्री !

**चिऊ** : अहो, हा आजचा अंक नाहीं. हा कालचाच अंक आहे 'ठणाण'चा ! कालचा अंकच आजचा समजून नव्या दमानं वाचत होतां वाटतं तुम्ही !

**बाळासाहेब** : ( हंसून ) काय ? कालचा अंक आहे तो ? तरी वाटलंच मला चुकल्या चुकल्यासारखं. शेवटीं आम्हीच बावळट ठरलों म्हणायचे !

**चिऊ** : अहो, ठरायचं काय आहे त्यांत नवं ?

**बाळासाहेब** : चिऊ, चिऊ, चांगलं नाहीं बरं हें ! चिचुंद्रीचा चिमुटभर चिमणा चावा चवीला चांगला लागत नाहीं.

**चिऊ** : बाळेकुंद्री ! किती बाई चमत्कारिक बोलतां तुम्ही मधून मधून !

**बाळासाहेब** : चिऊ, चिऊ, माझं बोलणं तूं केव्हां मनावर घेणार ? किती वर्षं, किती युगं वाट पहात बसायचं बरं आम्हीं ? दहा वर्षं झालीं

तुझी माझी ओळख होऊन. या लॉज्च्या धंद्यांत तूं माझी पार्टनर झालीस; पण चिऊ, तूं माझ्या जीवनाची पार्टनर कधीं होणार ?

**चिऊ** : बाळासाहेब, नका गडे असे जिव्हाळ्यानं बोलूं. कससंच होऊं लागलं मला. मी दुसऱ्याची लग्नाची बायको आहे हें कसं विसरून चालेल आपल्याला ?

**बाळासाहेब** : दुसऱ्याची बायको ? चिऊ, गळ्याची शपथ घेऊन सांग. नवऱ्याचं तोंड तरी उभ्या जन्मांत कधीं पाहिलं आहेस का तूं ? तुझ्या वडिलांनीं मरतांना सारी हकीकत सांगितली आहे मला. किती हळहळत होता बिचारा !

**चिऊ** : ( गहिंवरून ) बापाचं आंतडं होतं तें ! दरिद्री उपासमारी वांचविण्यासाठीं मी अजाण असतांनाच त्यांनीं पैसे घेऊन नाइलाजानं माझं लग्न लावून दिलं. आपण कांहीं वाईट करतों आहोंत हें कळत का नव्हतं त्यांना ? पण पोटासाठीं मनुष्य काय पाप करणार नाहीं बाळासाहेब ?

**बाळासाहेब** : पाप ! खरंच चिऊ, पाप-पुण्याच्या कल्पना अस्तित्वांत नसल्या तर माणसांत अन् जनावरांत कांहींच फरक उरला नसता. मात्र कांहीं पापं अशीं असतात कीं तीं केल्यानंच मनुष्याला पुण्य जोडतां येतं !

**चिऊ** : राजविलास लॉज्च्या मालकांनीं अशा गंभीर गप्पा मारणं बरं नाहीं दिसत बाळेकुंद्री !

**बाळासाहेब** : आलं ध्यानांत अं चिचुंद्री ? चिऊ, मग ' ठणाण 'चा चा आजचा अंक आला नाहीं वाटतं ?

**चिऊ** : आलाय् तर ? मघाशींच हणमूनं अकरा नंबरला दिलाय्.

**बाळासाहेब** : चिऊ, अंक कुणाला पाह्यचाच असेल तर त्याला इथं ऑफिसांत येऊन पाहात जा म्हणावं. खोलींत नेऊन एकट्या एकट्यानं पाहात बसण्यांत दुसऱ्याची किती गैरसोय होते बरं ! चिऊताई, यापुढं आपला अंक असा उघड्यावर टाकतच जाऊं नका. आपल्या प्रायव्हेट खोलींत ठेवीत चला. गिऱ्हाइकांना काय ? द्यावं तितकं हवंच आहे !

**चिऊ** : बाळासाहेब, अहो 'ठणाण'चा अंक तो काय अन् त्यासाठीं तुम्ही एवढं चिडतां काय ?

**बाळासाहेब** : चिऊताई, हा चिडण्याचा प्रश्न नाहीं. हा शिस्तीचा प्रश्न आहे. आपल्या लॉज्‌मध्यें गिऱ्हाइकांनीं काय वाटेल तें सोडलं तरी शिस्त सोडतां कामा नये.

**चिऊ** : इश्श ! लॉज्‌चं नांव म्हणे राजविलास ! तिथं कसा चालेल शिस्तीचा दरारा ? अहो, छपन्न गांवचे हरहुन्नरी लोक येणार इथं आपल्याकडे अन् त्यांना कसं सांगायचं बाई कीं आमच्या अिथल्या मासिकांना अन् अंकांना हात लावूं नका म्हणून ?

**बाळासाहेब** : चिऊ, तुझ्यासारख्या समंजस मुलीनं असं कांहीं तरी बोलूं नये वेड्यासारखं. आजचा पत्रव्यवहार लिहून झाला का ? टपाल पाह्यलं का ?

**चिऊ** : त्या मोहनशेटचं पत्र आलंय कीं दोन सीटस्‌ची स्पेशल खोली चार दिवसांसाठीं राखून ठेवा म्हणून. शनिवारीं येईन म्हणतो. जरा नव्या भक्कम कॉट्स ठेवायला सांगितलं आहे त्यांनीं.

**बाळासाहेब** : ते शेटजी का ? माफ करा म्हणावं त्यांना. नुसतं पैसा हें आमचं ध्येय नाहीं. लेकाचा गेल्या खेपेला म्हणाला कीं गेल्या चळवळींत पडून तुरुंगांत जावं लागल्यामुळं सुटून आल्यावर जरा करमणुकीसाठीं चार दिवस मुद्दाम सहकुटुंब राह्यला आलों आहें म्हणून. अन् इथं तर भलतीच चळवळ केलीन् गुलामानं ! कसचं कुटुब न कसचं काय ! चळवळी करतो आहे लेकाचा ! तिनं खेटरानं मारून शोभा करून निघून गेली तेव्हां लख्ख प्रकाश पडला नात्याचा !

**चिऊ** : बाळेकुंद्री, दुसऱ्या गिऱ्हाइकाच्या भानगडींत पडण्याचं आपणांला काय कारण ? एखाद्यानं येऊन खोली घेतली, आपलं आपल्याला भाडं दिलं, दुसऱ्या कुणाला त्रास दिला नाहीं कीं संपलं ! यापेक्षां जास्त खोलांत शिरायची आपल्याला काय जरुरी ?

**बाळासाहेब** : वाः रे वा चिऊ ! माझा लॉज् म्हणजे मी माझ्याच गोतावळ्यातलं एक कुटुंब समजतों. त्यांतल्या प्रत्येकाचं वर्तन धुतल्या

तांदुळासारखं स्वच्छ पाहिजे समजलीस? रंगेल उनाडांच्या सोयीसाठीं, नुसतं पैशाकडे पाहून पोट जाळायचं नाहीं आपलं! लॉज्‌चा धंदा म्हणजे मी एक पवित्र धंदा समजतों. भलते धंदे चालायचे नाहींत इथं!

**चिऊ** : बाळेकुंद्री, धंद्याबद्दल कित्ती उच्च कल्पना आहेत या तुमच्या! पण कांहीं असलं तरी आपल्याकडे कोण कसा इसम येईल हें कसं सांगणार आपण? बाहेरच्या पोषाखावरून जर माणसाची पारख करतां येती तर जगांत महात्म्यांचीच हुल्लड उठली असती. वाईट माणूस औषधाला देखील मिळाला नसता.

**बाळासाहेब** : चिचुंद्री! (सुस्कारा सोडतो.)

**चिऊ** : (सुस्कारा टाकून) काय बाळेकुंद्री?

**बाळासाहेब** : माझ्या लॉज्‌बद्दल अन् जगाच्या चांगुलपणाबद्दल केवढालीं मनोराज्यं करतों मी. आपण साठ मजली रंगीत सिमेन्ट कॉंक्रीटचा उंच लॉज् बांधला आहे. (डोळे मिटून) जवळच सागराच्या लाटा खळाळत आहेत. चिऊ, चिऊ, तूं आणि मी आपण दोघं साठ मजल्याच्या वरच्या गच्चींत आपलीं हृदयं गुलाबफुलांच्या पुड्याला बांधलेल्या दोऱ्यानं एके ठिकाणीं गुंडाळून चांदण्या रात्रीं पांवा वाजवीत बसलेल्या श्रीकृष्णाच्या मूर्तीची प्रार्थना करीत आहोंत. लॉजमधलीं गिऱ्हाइकं भगवंताच्या प्रार्थनेचं कोरस गीत गात आहेत. कुणी बिलं बुडवत नाहीं. कुणी उशा-अभ्रे पळवीत नाहीं. कुणी खोटीं नातीं सांगत नाहीं. कॉट्स् मोडत नाहीं. फार काय, पण ढेकूण देखील कुठं दृष्टीस पडत नाहीं.

**चिऊ**—(मोठ्यानें हंसून) बाळेकुंद्री, अहो, तुम्ही गंभीरपणानं बोलतां अन् मिस्किलपणाहि करतां कीं! अशीं मनोराज्य का कुठं खरीं होतात? अहो, कुणी अस्सल डाकू संभावित पोषाखांत लॉज्‌मध्यें आला तर ओळखायचा कसा आपण त्याला?

**बाळासाहेब** : सगळं ओळखतां येतं. खोटं आपोआप चव्हाट्यावर येईल. आपलं मन स्वच्छ ठेवलं म्हणजे झालं. चिचुंद्री, आतां हेंच पहा, आजच्या 'ठणाण' पत्रांत ही जाहिरात आली आहे ना हजार रुपये इनामाची?

**चिऊ** : आजच्या नाहीं—कालच्या!

**बाळासाहेब** : बरं, कालच्या. आतां हाच डाकू समज आपल्याकडे आला— तर काय ओळखणार नाहीं होय आपण त्याला ? बिशाद काय ?

**चिऊ** : ओळखाल तुम्ही ?

**बाळासाहेब** : अग, मग सांगतों काय ? असं माणूस झांकून राहात नाहीं. नजर साफ पाहिजे ! डोळे उघडे पाहिजेत !

**चिऊ** : मग त्या मोहनशेटला काय कळवूं ?

**बाळासाहेब** : काय कळवायचं ? अग, आतां जागा तरी आहे का शिल्लक ? सगळ्या खोल्यांतून ढेकणासारखीं गिऱ्हाइकं गच्च भरून राहिलीं आहेत. आतां आणखी कुठं जागा द्यायची ? डोक्यावर का बसवायचं गिऱ्हाइकांना ?

**चिऊ** : बाळेकुंद्री, मला एक विचार सुचलाय् गडे ! हें एवढं ऑफिस करायचं काय मोकळं ठेवून म्हणतें मी. राहतील चार गिऱ्हाइकं इथं. लोकांची सोय होत असेल तर ऑफिसांत छाटाछाट करायला काय हरकत आहे ?

**बाळासाहेब** : वा रे वाः ! चिऊताई चिचुंद्री, अग या बाळेकुंद्रीवर मात केलीस तूं आज. याला म्हणतात खरी धंदेवाईक दृष्टि ! गिऱ्हाइकाच्या सोयीसाठीं आपली गैरसोय झाली तरी हरकत नाहीं ! छान ! उत्तम ! तुझी कल्पना कांहीं वाईट नाहीं. सध्यां जागेची इतकी गळचेपी झाली आहे कीं, लोक स्वैंपाकघरांतल्या कोनाड्यांत अन् शिंक्यांत देखील लोंबकळत राह्यला तयार होतील समजलीस ?

**चिऊ** : मग मोहनशेटला तसं कळवितें.

**बाळासाहेब** : नाहीं. त्याला मात्र आमच्याजवळ जागा नाहीं. जाड पायांच्या स्पेशल कॉट्स् करून द्यायला आमच्याजवळ पैसे नाहींत. त्याला कळव तुमच्यासाठीं आमच्याकडे जागा शिल्लक नाहीं.

**हणमू** : ( आंतून ओरडतो ) साहेब, तुम्ही तर हांक नाहीं मारतो. आमचा तर निकडीचा काम असतो. आंत येऊन सोडूं काय म्हणतो.

**बाळासाहेब** : ये बाबा ! ये हनुमन्ता ! येऊन सोड काय तुला सोडायचं तें.

**हणमू** : (प्रवेश करून) साहेब ! अठरा लंबर पीऊन टेर पडले. काटखालीं सरपटत शिरले. मच्छरदाणी नेसले. गादी पांघरले. अय्यायो. साहेब ! भडभडा ओकले अठरा लंबर ! काय करून सोडूं म्हणते ?

**चिऊ** : मालकाचं ध्येय कुणीकडे अन् गिऱ्हाइकांचं वर्तन कुणीकडे !

**बाळासाहेब** : हणमू ! आणखी पॅसेन्जर आहेत ना त्या खोलींत ?

**हणमू** : स्वामी ! सगळे नाक दाबते ! कोकलते !

**बाळासाहेब** : चिऊताई ! फोन करून ॲब्म्युलन्स मागवा ! पोहोंचवा त्याला इस्पितळांत ! हणमू, खोलींत खराटा फिरवून घे.

**हणमू** : अय्यायो ! अरे हा हनुमन्त ! हातांत खराटा घेते. घाण झाडते. व्यंकटरमणा ! अरे तूं हें बघतीस काय म्हणतो ? हनुमन्ताचा अपमान होतो.

**चिऊ** : तर तर ! मोठा हनुमानाचा अवतार कीं नाहीं तूं ! बाकी चेहरा दिसतो आहे खरा तसा ! तेवढी शेपूट दिसत नाहीं. मिळाली तर बघ कुठें.

**हणमू** : आक्का ! थट्टा करते ?

**बाळासाहेब** : हणम्या, लघळपणा करूं नकोस. आटप. सांगितल्या कामाला लाग. राजविलास लॉज्मध्यें कामाचा चुकारपणा होतां कामा नये. जा अगोदर.

**हणमू** : हनुमंता, उडी मारून सोड बाबा ! ( जातो. )

**चिऊ** : बाळासाहेब, पाहिलंत ना एकेक गिऱ्हाईक कसं आहे तें ? आपण पुष्कळ तत्त्वाला चिकटून बसलों पण लोकांनीं तसं बसूं दिलं पाहिजे ना ? हल्लींचे लोक कसले वस्ताद झाले आहेत ! माझे बाबा एवढे करडेपणानं वागत होते पण अखेर कुणा लफंग्यानं फसवलंच कीं नाहीं त्यांना ?

**बाळासाहेब** : खरं आहे बुवा ! लफंग्यानं नुसतं फसवलं नाहीं. तर अखेर म्हातारा हाय खाऊन खलास झाला, अन् तुझी उभी हयात कायमची आडवी झाली. नवऱ्याला लग्नांत सुद्धां पाहिला नाहींस ! लग्नानंतर तो एकदम नाहींसा झाल्यामुळं पुन्हां कधीं दिसायचाहि नाहीं !

**चिऊ** : लोक म्हणतात पक्का बदमाष होता. बाबांना थोडा पैसा मिळाला; पण काय उपयोग झाला ? तें कांहीं नाहीं बाळासाहेब ! हें जग म्हणजे बदमाषांचा बाजार आहे. चांगूलपणानं वागणाराचा निकाल लागायचा इथं !

**बाळासाहेब** : छेः छेः ! चिचुंद्री, असा त्रागा करायचं मुळींच कारण नाहीं. मी कांहीं जगाबद्दल इतका निराश झालों नाहीं अजून. मनुष्य परिस्थितीनं बदमाष बनतो. सारीं अंतःकरणं मुळांत चांगलींच असतात चिऊ !

**चिऊ** : जाऊं दे ! माझीं अजून पुष्कळ कामं पडलीं आहेत. गंभीर विषयांची खिचडी लॉज्मध्यें खपायची नाहीं बाळेकुंद्री !

**हणमू** : ( प्रवेश करून ) साहेब ! बाहेर एक म्हातारी, एक छोकरा आली. आंत येऊन सोडूं का म्हणतो. पॅसेंजर दिसतें.

**चिऊ** : म्हातारी अन् छोकरा ? नातवाला घेऊन कुणी आजीबाई तीर्थयात्रेला तर नाहीं ना निघाल्या ?

**बाळासाहेब** : चिऊताई ! ऑफिस गुंडाळून ठेवायचं ठरलं ना ? का त्यांना बाहेरच्या बाहेरच रवाना करायचं ?

**चिऊ** : बघूं या तर खरं कोण म्हातारी आहे ती ! बिचारी दमून आली असली तर टेकूं दे तरी जरा ! माझे वडील गेल्यापासून म्हाताऱ्या माणसांबद्दल मला फार फार आपलेपणा वाटायला लागलाय्.

**हणमू** : शीः शीः ! चिऊ आक्का ! म्हातारा बुद्रूक बन्दानु ! शीः शीः ! हरेदावा तरुण. वळे कॅंप ! फार सुंदर !

**चिऊ** : अहो अप्पा ! पुरे कीं तुमच्या गप्पा !

**बाळासाहेब** : हणमू, आंत घेऊन ये बघूं कोण म्हातारी अन् छोकरा आला आहे त्यांना ? आणि हें बघ हनुमन्ता— ( हें बाळासाहेबांचें वाक्य पुरें होण्याअगोदरच एक म्हातारे, सुमारें साठीपर्यंत पोहोंचलेले, शिक्षण-खात्यांत पेन्शन घेतलेले गृहस्थ व त्यांचेबरोबर एक त्यांची नात शोभेल अशी एक सुंदर १८-२० वयाची तरुणी असे दोघे एकदम प्रवेश

करतात. म्हाताऱ्याच्या गळ्याभोंवतीं उपरणें अगर स्कार्फ गुंडाळलेला. पायांत पायमोजे व पादत्राण आणि दोन्ही हातांत हातमोजे. हा सारा थाट अंगांतील ऊब नाहींशी झाल्यामुळें बाहेरच्या थंडीची तरी आणखी बाधा होऊं नये म्हणून मुद्दाम केलेला असतो. दांतांची कवळी नैसर्गिक दांतां-सारखी दिसत असून, मुद्दाम अवसान दिसण्यासाठीं वाढवून आंकडे वळविलेल्या मिशाही कलप लावून काळ्याभोर केलेल्या आहेत. यांचं नांव रावसाहेब चंद्रचूड आणि नात दिसणाऱ्या त्यांच्या चौथ्या कुटुंबाचें नांव सौ० तारा.)

**रावसाहेब** : ( आंतून येतां येतां मोठ्यानें 'एक दोन तीन चार पांच अन् सहा' असे आंकडे मोजत येतात.) सहा ! म्हणजे मोठी गम्मत आहे पहा.

**हणमू** : ( एकदम ओरडून ) अरे मनुष्या ! एकदम आंत घुसलीस ?

**रावसाहेब** : काय घुसली ? अरे, मराठी व्याकरणांतलं साधं पुल्लिंग, स्त्रीलिंग, कांहीं कळतं का तुला ? या पुल्लिंगाला 'घुसलीस' म्हणतोस ? थांब गुलामा तुला तर्खडकरच कोळून पाजला पाहिजे ! ( वेडावून ) म्हणे घुसलीस ? अरे, कांहीं दिसतंय् कीं नाहीं तुला ?

**तारा** : ज्याला त्याला शिकवण ! अहो, जगांत भेटेल तो प्राणी तुम्ही आपला विद्यार्थी समजतां कीं काय ?

**रावसाहेब** : शंका आहे कीं काय ? ठाऊक नाहीं अजून कुणाला आमचा खरा इंगा ! म्हणून तर अशी छडी घेऊन हिंडत असतों आम्ही नेहमीं. अग, या छडीनं तर साऱ्या शिक्षणखात्याची सफाई करून टाकलीय्, आहे ठाऊक ? रात्रीं झोंपेंत सुद्धां उगाच नाहीं छडी हातांत धरून ठेवत ? शिक्षणखात्याचा दरारा म्हणजे या गाढव-घोड्यांचा खरारा आहे समजलांत ?

**तारा** : इश्श ! मला काय दम दिल्याचं सोंग करतां चारचौघांत ? अहो, एवढ्यानंच दम लागला तुम्हांला ! उपरण्यानं तोंडाच्या कोपऱ्यांतला फेंस तरी टिपून घ्या तेवढा !

( रावसाहेब तोंड पुसता. हणमू मोठ्यानें हंसतो. )

**रावसाहेब** : ए ? हंसतोस काय ? मालक कुठं आहेत तुझे ? तोंडी प्रश्नाचं उत्तर धडाधड देतां आलं पाहिजे. अरे मूर्खा, तोंडींत जर तुझी ही रड तर लेखींत खाशील ना पड ! बोल कीं !

**हणमू** : ( मोठ्यानें हंसू दाबीत ) शिवा शिवा. अरे काय बोलतेस ?

**रावसाहेब** : पुन्हा काय बोलतेस ? अरे व्याकरणिच्या !

**बाळासाहेब** : अरेच्या ! अहो मिस्टर, जरा बेतानं घ्या.

**चिऊ** : अरे हणमू ! हीच का तुझी म्हातारी ? अन् हाच का तुझा छोकरा ?

**रावसाहेब** : काय ? म्हातारी अन् छोकरा ? मी म्हातारी काय ? अन् हा छोकरा काय ? अरे, काय आहे काय ?

**बाळासाहेब** : तसं नाहीं. हा हनुमन्त बोलण्यांत थोडा गोंधळ करतो म्हणून एखाद वेळेला गोंधळ उडतो.

**रावसाहेब** : याचं नांव हनुमन्त वाटतं ? तरी म्हटलं व्याकरणांत वेड्यावांकड्या उड्या काय मारतो आहे पोऱ्या !

**हणमू** : अरे प्राणी ? तें जानवें आंत लपवून ठेव कीं. उघड्यावर कशाला टाकून सोडते ! अरे ब्रह्मगांठ लपवून सोड म्हणतो.

**तारा** : ( हंसत ) कशाची गांठ सोडायची म्हणतो आहे ?

**रावसाहेब** : तो कांहीं म्हणाला तरी माझ्याशीं गांठ आहे !

**तारा** : अहो, पण तुम्ही मोठे आंतल्या गांठीचे आहांत हें त्याला कसं कळणार ?

**बाळासाहेब** : अहो, पण कुणाची गांठ घ्यायची आहे तुम्हांला ? काय काम आहे तुमचं ? नांव काय आपलं ? आपण कोण ? या कोण ?

**रावसाहेब** : छान ! कसे सुंदर प्रश्न विचारलेत. पाहिजे तर माझ्या वशिल्यानं तुम्हांला एस्.एस्.सी.ला परीक्षक नेमतों. गोड प्रश्न विचारावेत तर महाराजा असे सरळ अन् सुटसुटीत विचारावेत. नाहीं तर हा— हा बिन-शेपटीचा !

**हणमू** : अरे दुष्टा ! आमची शेपूट काढतेस ? ( तारा हंसते.)

**रावसाहेब** : काय ग ! तूं कां दांत काढतेस ?

**तारा** : इश्श ! दांत काढायला माझी साठी नाहीं उलटली अजून.

**हणमू** : ( खिकाळून ) छान. छोकरा म्हातारीस छान ठोकला. चांगला दांत पाडली. माझी थट्टा करते !

**रावसाहेब** : अरे राम ! अरे राम ! दांत पाडली. म्हातारीस ठोकला ! अरे, मराठी भाषेचा मुडदा पडतो आहे रे हा ! असली भाषा ऐकून आमच्या स्वर्गवासी व्याकरणपंडितांना मेल्याहून मेल्यासारखं होत असेल !

**तारा** : तुमचं तें व्याकरण अन् उपरणं, जरा बाजूला ठेवा.

**रावसाहेब** : तारामती ! अग असं पोरीसोरींनीं बाष्कळ बोलूं नये. ही मंडळी काय बरं म्हणतील आपल्याला !

**तारा** : ती बिचारी काय म्हणणार ? आपण दाखवूं तें पाहतील अन् शोभेल तें बोलतील. नाहीं का हो मिस्टर ? नांव काय तुमचं ? या कोण तुमच्या ? तुम्ही कोण इथले ? मालक कुठं आहेत ?

**रावसाहेब** : तारामती ! तारामती ! गहजब गहजब केलास ! अन् काय मुद्देसूद प्रश्न विचारलेस ! तुला बी.टी. करून टाकतों. नाहीं सोडणार.

**तारा** : तुम्ही काय करणार मला बी.टी. ? अहो, तें सारं माझं मलाच केलं पाहिजे. बघूं या. काय जमेल ते खरं.

**बाळासाहेब** : हें पहा, आम्हांला जरा बोलण्याची सवड देणार का ?

**रावसाहेब** : अहो, देणार का म्हणजे काय ? दिली— एकदम दिली. आतां तुम्हीच बोला. अहो, आतां आमचे बोलायचे दिवस उरले नाहींत. आम्ही म्हणजे कर्तृत्ववान मंडळी. काय तारामती ? बरोबर आहे ना ?

**तारा** : कपाळ आहे बरोबर ! आपल्या कर्तृत्वाची टिमकी अशी तोंडानं आपणच नसते वाजवायची ! लोकांना ती आपोआप समजली पाहिजे. नाहीं का हो बाई ? अहो, तुम्ही बोलत कां नाहीं ?

**चिऊ** : अहो, तुम्हीच आल्यापासून एकसारखे दोघेजण बोलताहात. ऐकायला तरी हवं ना कुणी ?

**तारा** : इश्श ! अहो, कांहीं बोलणीं ऐकण्यासारखीं नसतात.

**चिऊ** : म्हणजे काय ? न ऐकण्यासाठीं बोलण्याची कांहीं नवी पद्धत निघाली आहे कीं काय ? होय का हो आजोबा ?

**रावसाहेब** : आं ! काय आजोबा ? आला का पुन्हा प्रसंग ! एवढ्या काळ्याभोर मिशा उभारून न वांकतां चांगला चालतोंय बोलतोंय. तरी आपले लेकाचे मला आजोबा म्हणतात ! जिथं जावं तिथं हेंच ! मी आजोबा काय ? आजोबांतलं काय पाहिलंत हो माझ्यांत ? उत्तर द्या ! नाहीं तर दोन छड्या देईन. सोडणार नाहीं.

**हणमू** : अयाऽयो येनं री अप्पा ? अरे बाईस छडी मारतेस ? ठोसा पाहिलीस का ?

**रावसाहेब** : अरे, पाहिली पाहिली तुझी ठोसा ! ठोसाठोशीं करणारा रेडाच कीं नाहीं तूं ?

**हणमू** : अरे, मला शिव्या देतेस ?

**रावसाहेब** : हो हो हो ! बेट्या, लंबे करीन. ध्यानांत ठेव.

**तारा** : अहो, भांडतां काय असे ज्याच्या त्याच्याशीं ? चांगलीं चांगलीं शहरं, प्रेक्षणीय स्थळं पाहण्यासाठीं म्हणून प्रवासाला निघालों आपण, अन् घराबाहेर पडल्यापासून कुठला जोर आला तुम्हांला ? आपले ज्याच्या-त्याच्याशीं भांडताहेत– क्षणाक्षणाला वर्दळीवर येताहेत ! आगगाडींत एक ढेरपोट्या मारवाडी बसायला जागा देईना तर त्याच्या अन् त्याच्या सवाई असलेल्या शेठाणीच्याच मधें बसायला लागले. दोघांतिघांनीं उपरणं खेचून विहिरींतून बादली उचलल्यासारखं यांना वरच्या बर्थवर उचलून घेतलं म्हणून तो प्रसंग कसाबसा निभावला !

**रावसाहेब** : मग सोडतों कीं काय ? तत्त्वाकरतां झगडणं हें प्रत्येक नागरिकाचं कर्तव्य आहे. अग, असा आम्ही झगडा करायचे म्हणून आम्हीं शिकवलेली पिढी कणखर झाली. आम्ही उगाच नाहीं भांडायचे कारणा-शिवाय. काय हो मिस्टर ? बोलत कां नाहीं आतां ?

**बाळासाहेब** : ( सुस्कारा टाकून ) तुमचं एकदां बोलण्याचं वारं संपून भाता सैल पडूं द्या. मग आम्ही बघूं. चिऊताई, यांचं बोलणं संपेपर्यंत आपण आंत जाऊं जरा.

**तारा** : इश्श ! म्हंजे या चिऊताई का ? हात ग चिऊ ? चिऊ चिऊ चिमणीची ! घोडी शोभे धमणीची !

**चिऊ** : अहो ! पोरवय असून फटकळपणाही येतो कीं करतां तुम्हांला !

**तारा** : चिऊताई ! ( तिच्याजवळ जाऊन ) रागाऊं नका गडे ! तुम्हांला पाहिल्याबरोबर मला माझ्या थोरल्या बहिणीची आठवण झाली. म्हणून मी उगाच कांहींतरी थट्टेनें बोललें. रागाऊं नका.

**चिऊ** : म्हणजे आतां आणखी कुणी बहीण यायची आहे कीं काय इथं तुमची ?

**तारा** : ( गहिंवरून ) बहीण ! बहीण कुठली यायला इथं चिऊताई ? ती केव्हांच स्वर्गांत निघून गेली. ती गेली. आई गेली. भाऊ गेले. वडील गेले. सारीं-सारीं गेलीं. मी राहिलें चिऊताई !

**रावसाहेब** : पुरे पुरे ! आपलीं रडगाणीं दुसऱ्यांना ऐकवण्यासाठीं नाहीं बाहेर पडलों आपण.

**तारा** : तुम्ही मला आतां कांहीं शिकवूं नका. सगळ्या परीक्षा पास झाल्याहेत बरं माझ्या !

**बाळासाहेब** : चिऊताई, यांचं नांव विचारा. या कोण ? यांच्याबरोबरचे हे कोण ?

**तारा** : इश्श ! खरंच कीं. माझं नांव तारा ! हे तारामती म्हणतात मला. आणि हे किनई ! हे माझे–

**रावसाहेब** : ( एकदम ओरडा करून : तिचं वाक्य तोडून ) तें मी सांगतों. ज्याची त्यानं ओळख करून द्यावी हें चांगलं. अहो– पण मिस्टर अहो, तुम्ही कोण ?

**बाळासाहेब** : मला बाळासाहेब बाळेकुंद्री म्हणतात.

**रावसाहेब** : अस्सं ! म्हणजे तुम्ही कर्नाटकी वाटतं ?

**बाळासाहेब** : नाहीं. आम्ही मुळांत दक्षिणीच ! पण तिकडे कर्नाटकांत आमच्या दोन पिढ्या वाढल्या त्या धांदलींत हें आडनांव चिकटलं झालं !

**रावसाहेब** : चिकटेल ! चिकटेल ! परप्रांतांत गेल्यावर कुठं काय चिकटेल याचा नेम नाहीं लागायचा ! मागें आम्ही एकदां मध्यप्रांतांत गेलों होतों नागपूरला. अहो, तिथं तर आमचे डोळेच चिकटायला लागले. हा भयंकर उन्हाळा !

**हणमू** : ( मध्येंच ) नागपूर ? आम्ही जाऊन सोडले ! मोठी शहर. हा थंडी ! ही उन्हाळा ! हा एकेक बोर ! जशी कलिंगड शोभते ! बळे कॅम्प !

**रावसाहेब** : हनुमंता ! हनुमंता ! अरे न झेपेल अशी उडी मारतो आहेस रे. अरे बोर कधीं कलिंगडाएवढं असेल का रे ? काय थापा मारतो आहेस ! अरे, थाप मारूं नये माणसांनीं.

**हणमू** : अरे स्वामी ! खोटे वाटती ! आणून दाखवून सोड्डूं काय म्हणतो ?

**रावसाहेब** : कांहीं दाखवूं नकोस अन् कांहीं सोडूं नकोस अं बाबा ! आम्हांला दोन दिवस राहून सहीसलामत जाऊ दे इथून. खरं कीं नाहीं बाळेकुंद्री ?

**बाळासाहेब** : अगदीं बरोबर आहे. आपलं नांव नाहीं सांगितलंत ? इतका वेळ तुम्ही अनोळखी राहणं बरं नाहीं दिसत.

**रावसाहेब** : कसं बोललां बाळेकुंद्री. या देहाला रावसाहेब चंद्रचूड म्हणतात.

**हणमू** : अरे स्वामी ! चंद्रचूडामणी तूं ? भाळ छलो.

**रावसाहेब** : काय हनुमंता ! कसं आहे नांव आमचं ?

**तारा** : इश्श ! आडनांवाचं काय कौतुक मांडलाहे ! तुम्ही या आड-नांवांत घुसलांत यांत तुमची कुठं कर्तबगारी निघाली ! धन दुसऱ्याचं अन् ओझं हमालाचं.

**चिऊ** : जाऊं द्या ताराबाई. अहो, कशाला उगाच तक्रार ? इतक्या वेळांत निदान आपल्याला एकमेकांचीं नांवं कळलीं हें काय थोडं झालं ? नाहीं तर या बोलण्याच्या झपाट्यांत पत्ताच लागायचा नाहीं कशाचा.

**तारा** : तर हो ! म्हणतात ना–जन्म गेला रेटारेटी हातीं आली करवंटी ! तशांतली गत !

**रावसाहेब** : वा ! याला म्हणतात बोलणं ! अहो, असं बोलण्यासाठीं आम्हीं वक्तृत्वोत्तेजक सभा काढल्या होत्या शाळांतून ! तारामती, काय आमच्या वेळच्या गमती !

**तारा** : तेव्हां जन्मसुद्धां नव्हता झाला आमचा.

**रावसाहेब** : अगदीं खरं ! जन्माआधीं तुम्हीं आमच्या त्या सभांना हजर राहून असंच गोड बोललां असतांत तर माझ्याच हस्तें एक मोठ्ठं पदक दिलं असतं मीं तुम्हांला.

**तारा** : पुरे. करायच्या काय त्या मागच्या आठवणी आतां? आम्हांला तें वक्तृत्वही नको अन् तें तुमचं पदकही नको. अहो पण इथले लॉज्‌चे मालक कोण ? अहो बाळेकुंद्री, तुम्ही इथले मालक बिलक तर नाहीं ना ?

**रावसाहेब** : काय हो बाळेकुंद्री ? अहो, तुम्ही तर नाहीं ना इथले मालक ? गचाळच दिसत्याहे एकंदर व्यवस्था. पूसतपास करायला कुत्रंसुद्धां कुणी फिरकलं नाहीं अन् म्हणे राजविलास लॉज् ! मालक भेटायला पाहिजे हो ! चांगला या छडीनं चोपूनच काढला असता. अरे, काय आहे काय ? चांगले चक्क पंधरा मिनिटें शंख करतों आहोंत आम्ही इथं ? आहे का कुणाचा एकाचा पत्ता ? काय रे ? कुठाय् मालक तुझा हनुमंता !

**हणमू** : येन रायर ? मालक कसा नसतो ? अरे, हेच आमचा मालक.

**रावसाहेब** : होय का हो बाळेकुंद्री ? तुम्हीच का मालक ?

**तारा** : अग बाई ? तुम्हींच का हो मालक ?

**बाळासाहेब** : ( हंसून. या जोडीला थापच मारून जरा गंमत करावी या विचारानें ) अहो, मालक म्हणजे मी या हनुमंताचा मालक आहें. इथल्या लॉज्‌चा मालक नाहीं. मी तुमच्यासारखाच गेस्ट म्हणून उतरलों आहें इथं आंतल्या खोलींत. मलाही मालक भेटायला पाहिजे हो ! असा चोपला असता गुलामाला !

**हणमू** : अयय्यो स्वामी ! अरे तुम्ही काय–

**बाळासाहेब** : हणम्या ! वटवट करूं नको उगीच. नाहीं तर तूं अलीकडे जरा जास्त उर्मटपणा करूं लागला आहेस. जा अगोदर आपल्या कामावर. चक्कर मारून ये.

**तारा** : म्हणजे आणखी चक्करहि आहे का हा ?

**रावसाहेब** : तरीच व्याकरणाचा गोंधळ उडवतो गुलाम.

**चिऊ** : बाळेकुंद्री ! अहो, काय बोलावं काय नाहीं माणसानं—

**बाळासाहेब** : तेंच या हणमूला कांहीं कळत नाहीं. जा, पळ. हांक मारल्याखेरीज येऊं नकोस. जा.

**हणमू** : ( आश्चर्यानें डोळे फाडीत 'मालक री काय करतेस ?' असें पुटपुटत निघून जातो. )

**रावसाहेब** : मालकाला 'काय करतेस ?' म्हणतोय् ? अरे, या मूर्खानं कांहीं नाहीं तरी टाळकं उठवलं आमचं ! बरं झालं एकदाची ब्याद गेली इथून.

**तारा** : अहो ! मराठी न जाणणारे रुळेपर्यंत असंच मराठी बोलतात. तो निदान कांहींतरी मराठी बोलतो आहे पण तुम्हांला एक तरी शब्द येईल का मराठी अन् इंग्रजी सोडून परभाषेचा ?

**रावसाहेब** : तारामती ? आमच्यांतला उणेपणा असा चव्हाट्यावर मांडूं नये. तो ज्याचा त्यानं ओळखून मनांत ठेवायचा असतो.

**तारा** : तर ! मी बरा ठेवीन मनांत. अहो चिऊताई, कुठल्या खोलींत उतरलाय् तुम्ही. मला जरा केव्हां थोडी निवांत बसेन असं झालंय्. मला एकदां बोलूं द्या तुमच्याशीं पोटभर ! चला ना गडे. चला. आम्हीं चांगले दोन दिवस राह्यला आलों आहोत इथं. जेवढ्या म्हणून इथल्या गमती जमती असतील तेवढ्या सगळ्या बघायच्या आहेत मला.

**बाळासाहेब** : खरं का ? अहो, मग इथं गमतीजमतींना काय हो तोटा या गजबजलेल्या शहरांत ? जिकडे तिकडे गमतीजमतींचा मिना बाजार भरलाय् बरं ! डोळे मात्र उघडे पाहिजेत.

**तारा** : माझे मात्र रात्रीच्या प्रवासाच्या जाग्रणानं डोळे मिटायला लागले आहेत. चिऊताई, चला ना गडे.

**चिऊ** : ( बाळासाहेबांकडे पाहत ) बाळासाहेब, आपल्या खोलींत म्हणजे यांना—

**बाळासाहेब** : अग, राहूं देत इथंच आपल्या खोलींत थोडा वेळ. मालक आल्यावर घेतील बघून. जा तुम्ही त्या आपल्या आंतल्या प्रायव्हेट कंपार्टमेंटमध्यें यांना घेऊन. पडूं द्या जरा निवांत.

**तारा** : बाळासाहेब, किती किती चांगले आहात हो तुम्ही ! आमच्या अडचणी कशा पटकन् ध्यानांत घेतां तुम्ही. चला ना चिऊताई.

**चिऊ** : चला ! ( असें म्हणून तारामतीला घेऊन आंतल्या खोलींत जाते. त्यांचे मागोमाग बाळासाहेब जाऊं लागतो. )

**रावसाहेब** : ( खुर्चीवर ऐसपैस बसत ) अहो बाळेकुंद्री, त्या दोघी आंत गेल्या आहेत. तुमची काय चालल्याय धांदल ! या, बसा. अहो, आम्हांला जरा मोकळं बोलूं द्याल कीं नाहीं ?

**बाळासाहेब** : छान ! म्हणजे इतका वेळ मोकळं बोललां नाहींत वाटतं ? काय हो रावसाहेब चंद्रचूड, तुम्हांला आम्ही आमची गैरसोय करून आमच्या खोलींत काय म्हणून उतरूं द्यायचं हो ?

**रावसाहेब** : अहो बाळेकुंद्री, जगांत कांहीं माणुसकी आहे का नाहीं ? आं ! वेळ पडेल तेव्हा दुसऱ्याचाही भार सहन करण्यांत भूषण आहे, नाहीं का ? जग म्हणजे कांहीं सगळाच लफंग्यांचा बाजार नाहीं. खरं कीं नाहीं ?

**बाळासाहेब** : ( त्याच्या हातमोजांकडे संशयानें बघत ) नाहीं म्हणजे सगळेच लफंगे असतात असं नाहीं; पण हें पाहा चंद्रचूड, अहो, या दिवसांत काय कुणाचा भरवसा धरायचा ? अहो, वरून चांगला पोशाखी दिसणारा माणूस अस्सल डाकू निघतो कीं कधीं कधीं !

**रावसाहेब** : बरोबर ! अगदीं बरोबर !

**बाळासाहेब** : बरोबर आहे ना चंद्रचूड ? द्या टाळी ! (हात पुढें करतो. विचार हा कीं, या टाळीच्या निमित्तानं तरी रावसाहेबांचा हातमोजानें झांकलेला हात चासपण्याची संधि मिळून हजार रुपये इनामाचा मोका सांपडतो कीं काय तें बघावं. पण रावसाहेब टाळीची कांहींच हालचाल न करतां महासारखे बसतात. )

**रावसाहेब** : तुमचं म्हणणं कबूल आहे आपल्याला. जगांत दिसतं एक अन् असतं भलतंच !

**बाळासाहेब** : अहो, म्हणून म्हणतों चंद्रचूड टाळी द्या ! ( हात पुढें करतो. )

**रावसाहेब** : कशाला टाळ्या देतांहात बाळेकुंद्री ! अहो, आपण सत्य बोलतों आहोंत ! टाळ्या द्यायला हें कांहीं व्याख्यान-मन्दीर नाहीं.

**बाळासाहेब** : कां हो ? टाळ्या द्यायची कां टाळाटाळ ? अहो, मी तर रोज पांच दहा मिनिटं टाळ वाजवून भजन केल्याखेरीज राहात नाहीं.

**रावसाहेब** : वारे वाः बाळेकुंद्री ! तुमचं आमचं जमणार बुवा ! अहो, वास्तविक मी कथेकरी व्हायचा !

**बाळासाहेब** : मग कुठं घसरलं ?

**रावसाहेब** : सगळंच घसरलं हो ! म्हणून तर ट्रेनिंग कॉलेजचा प्रिन्सिपॉल झालों. बाकी तिथं वर्गांत मुलांना शिकवतांना जवळ जवळ कथाच चालायची आमची. एकदां तर कारट्यांनीं ' सीताकांत स्मरण जय जय राम ' म्हणून भर वर्गांत आरोळ्या ठोकून लाथाबुक्यांनीं बाकांचा चुराडा करून टाकला.

**बाळासाहेब** : अहो, निदान पोरं तुम्ही शिकवतांना झोपत नव्हतीं हें काय थोडं झालं ?

**रावसाहेब** : बाळेकुंद्री ! तसं भलतं काहीं समजूं नका अं ! केव्हां केव्हा मागल्या बाकांवरचीं टारगट पोरटीं खरंच झोंप लागून एवढ्या मोठ्यांदा घोरायला लागायचीं कीं आम्ही गपचिप पाय न वाजवतां वर्गांतून पसार व्हायचे ! अहो, तसे आम्ही स्वभावानं मुळांत अगदीं पडवळ ! गरीब गाय म्हणा ना आम्हांला !

**बाळासाहेब** : अहो, तुम्हांला गाय कसं म्हणायचं ? तुमच्या व्याकरणाचा खून होईल ना आमच्या हातून. अन् लागाल पुन्हां शिव्या द्यायला अन् छड्या मारायला. खरं आहे ना चंद्रचूड ?

**रावसाहेब** : खरं आहे. पकडलंत आम्हांला बाळेकुंद्री !

**बाळासाहेब** : शेक शेक रावसाहेब. ( पुन्हां हात पुढें करतो. )

**रावसाहेब** : बाळेकुंद्री, खरंच बुवा जरा कंबर शेकाविशी वाटूं लागली आहे. बरी आठवण केलीत. आतां आम्हांला प्रवास, दगदग सोसत नाहीं. तसे कांहीं आम्ही म्हातारे नाहीं झालों म्हणा ! पण—

**बाळासाहेब** : म्हातारे कशाचे हो ! काय हो चंद्रचूड, तुम्हांला हस्त-सामुद्रिक येतं का हो ?

**रावसाहेब** : नाहीं हो ! तिथंच तर नडलंय् आहे आमचं. एकदा मला चांगलाच हात दाखवायचा आहे कुणाला तरी.

**बाळासाहेब** : काय म्हणतां ! अहो, मग लांब कशाला कुठं जायला पाहिजे ? हात पाहाण्याच्या बाबतींत माझा हात धरणारा कुणी नाहीं. बघूं दे, बघूं दे तुमचा हात ! (पुन्हां हात पुढें करतो.)

**रावसाहेब** : हात दाखवूं म्हणतां तुम्हांला ?

**बाळासाहेब** : तर हो, खडान् खडा भविष्य सांगतों तुमचं. हात पाहिला तुमचा की सगळा उलगडा होईल.

**रावसाहेब** : असं म्हणतां ? पण इथं नको बुवा. हें पहा, मी असा ज्योतिषाच्या नादीं लागलों कीं इच्या तळपायाची आग मस्तकाला जाते अगदीं.

**बाळासाहेब** : इच्या म्हणजे तारामतीच्या ना ? रावसाहेब चंद्रचूड, अहो ! एवढे शिक्षणखात्यांतले प्रिन्सिपॉल म्हणवतां तुम्ही अन् पोरीसोरींना भितां तुम्ही ? विश्वास बसणार नाहीं अशा गोष्टी सांगतां बुवा तुम्ही.

**रावसाहेब** : बाळेकुंद्री, म्हणजे आमच्याबद्दल कांहीं शंका येते कीं काय तुम्हाला ?

**बाळासाहेब** : तसं नव्हे हो चंद्रचूड. पण जरा तुमचीं बोटं चांचपूं द्या म्हणतों मी.

**रावसाहेब** : काय ? बोटं चाचपूं द्या. अरे, हात पाहतां पाहतां बोटं चांचपायला लागलां कीं तुम्ही ! बरं तर बरं, बोटांवरच थांबलांत. थोड्या वेळानं आमचं सामान, ट्रंक, वळकट्या चांचपायला लागाल. बाळेकुंद्री, चांगलं नाहीं बरं हें.

**बाळासाहेब** : काय रावसाहेब ! काय पराचा कावळा करताहांत हो ! समजा, मीं तुमच्या हाताचीं बोटं चांचपलीं तर त्यांत एवढं शंका घ्यायचं काय कारण हो ?

**रावसाहेब** : अहो, शंका काय विचारतां ? मागं मी एकदा येरवड्याला गेलों होतों.

**बाळासाहेब** : ( चमकून ) येरवड्याला का ? वाटलंच मला. चंद्रचूड, तुम्हांला तिथं कष्ट पडले असतील ?

**रावसाहेब** : तर हो. कष्ट म्हणजे काय विचारतां ? अहो, तिथल्या शाळेचा बक्षिससमारंभ आमच्या हस्तें झाला बाळेकुंद्री. अहो, प्रत्येकाची तपासणी व्हायची ना तिथं !

**बाळासाहेब** : म्हणजे तुमच्याही झडत्या घेतल्या आहेत तर रावसाहेब !

**रावसाहेब** : छेः छेः ! अहो, माझी कोण झडती घेणार ? नाहीं म्हणायला एकदां मात्र आमच्या साहेबांनीं आम्हांला झाडलं होतं बरं का ?

**बाळासाहेब** : म्हणजे येरवड्याला तुम्ही राहिलां होतांत तर ?

**रावसाहेब** : तसा कांहीं फार दिवस नाहीं. आमचं एक कुटुंब वारलं. तेव्हां चुकून कांहीं दिवस मी अगदीं मोकळाच पडलों होतों. सहज आमच्या एका मित्राच्या नादानं एक खोली घेऊन हवा बदलण्यासाठीं राहिलों होतों झालं तिथं. बरं वाटलं बरं का तिथं फार ! अहो, व्याप नाहीं जिवाला कुणाचा ! कुणी फारसं ओळखीचं नाहीं. कुणी बोलायचं नाहीं. कांहीं नाहीं. ासं म्हणजे आमचे तिथले दिवस मोठे गमतींत गेले. बाळेकुंद्री—

**बाळासाहेब** : काय म्हणतां चंद्रचूड ?

**रावसाहेब** : अगदीं जिवाचं रहस्य सांगतों तुम्हांला. सांगूं नका कुणाला. अजून देखील वाटतं कधीं कधीं आपण आपले येरावड्यालाच बरे. शांत. डोक्याला त्रास नाहीं. स्वतंत्र !

**बाळासाहेब** : स्वतंत्र ? अन् पुन्हा खर्च नाहीं कांहीं !

**रावसाहेब** : कसं सोळा आणे बोललांत बाळेकुंद्री ! पण काय करावं हो ! तारामती आहे ना !

**बाळासाहेब** : हो. आहे बिचारी. पोरवय आहे त्यांतून. तुमची नात का मुलगी ती ?

**रावसाहेब** : ( चमकून ) नात का मुलगी ? अहो बाळेकुंद्री, काय सांगावं तुम्हांला ?

**बाळासाहेब** : म्हणजे ? त्यांतही कांहीं भानगड आहे का ?

**रावसाहेब** : ( सांवरून. ' जाऊं द्या. मारूं या झालं थांप. जितकं सांवरून नेतां येईल तितकं नेऊं. कशाला करून घ्या उगाच शोभा. राह्यचंय् असं कितीसं इथं ? ' असे विचार क्षणार्धात मस्तकांत चमकून जातात.) भानगड कसली ? आतां कसल्या भानगडी करणार आम्ही कपाळाच्या ? तारामती म्हणजे आमची हीच आहे.

**बाळासाहेब** : ही म्हणजे मुलगीच दिसते आहे !

**रावसाहेब** : दिसते आहे म्हणजे काय ? मुलगीच आहे ती ! शंका येण्यासारखं काय आहे बुवा त्यांत ? मुलगी नाही का दिसत ती ? ( लबाडीनें हंसत हंसत श्लोक किंवा अभंग गुणगुणूं लागतात. बाळासाहेब टाळ्या वाजवून ताल धरतात.

**[ ● नाटिकेचे दोन भाग करावयाचे असल्यास या ठिकाणीं मध्यंतर करतां येण्यासारखें आहे. ● ]**

हें चालू असतांना तारामती आंतून गोंगाट करीत धांदलीनें बाहेर येते. तिच्या मागोमाग चिऊ असते.)

**तारा** : अहो– अहो ! तुम्ही तरी पाहिलीत का कुठं ? व्हिक्टोरियांतून बाहेर उतरले तेव्हां चक्क चांचपून पाहिली होती मीं. जागच्या जाग्यावर होती. अन् एकदम कशी नाहींशी झाली ? कुठं सांपडत नाहीं ! अहो, पाहिलीत का तुम्हीं ? बाळेकुंद्री, अहो तुम्हीं तरी पाहिलीत का ?

**रावसाहेब** : तारामती ! तारामती ! काय पाहिलं ? काय कुठं गेलं ?

**तारा** : अहो, माझी गळ्यांतली मोत्यांची माळ गेली कुठं तरी ! खास–खास उडवली हो कुणींतरी !

**रावसाहेब** : काय माळ गेली ?

**बाळासाहेब** : म्हणजे तुमची मोत्यांची माळ दुसऱ्यानं पळवली ? आश्चर्य आहे बुवा !

**चिऊ** : अहो, आंत जाऊन जरा कुठं बसतों न बसतों, जरा कुठं बोलतों न बोलतों, तों आपला सहज यांचा हात गळ्याकडे गेला अन् लागल्या बाई एकदम कसंसंच करायला !

**तारा** : चिऊताई, कसंसंच वाटलं जरासं हो ! भारी किंमतीची होती. पूर्वी मला फार हौस वाटे दागिन्यांची; पण अलीकडे नाहीं तरी जरा मला वीटच आला होता त्यांचा !

**रावसाहेब** : तारामती ! दागिन्यांचा वीट आला होता तर कशाला बरोबर घेतलेस ते प्रवासांत ? तरी निघतांना बजावलं होतं कीं, बाई, अगोदर असली भारी जिन्नस बरोबर घेऊं नकोस ! अन् घेतलीस तर अशी उघड्यावर दाखवूं नकोस ! कुठल्या तरी चोरट्यानं मारला असेल डल्ला ! अहो, चोरट्याला काय ! खरं कीं नाहीं हो बाळेकुंद्री ?

**बाळासाहेब** : चंद्रचूड, चोरट्यांचा अनुभव यापूर्वी आम्हांस आला नव्हता. द्या टाळी !

**रावसाहेब** : अरे काय ! द्या टाळी काय ! प्रसंग काय अन् कुठं टाळी मारतां हो ?

**बाळासाहेब** : चुकलों. माफ करा अं ! मधून मधून असंबद्ध बोलायची संवय लागली आहे मला.

**तारा** : जाऊं द्या हो तुमचं ! नाहीं ना तुम्ही कुणीं पाहिली ? बाळेकुंद्री, मी आपली जरा स्पष्ट बोलणारी आहे. तुमच्या त्या बिनशेपटाच्या हनुमन्ताचा—

**हणमू** : ( धांदलीनें प्रवेश करतो. सारे गप्प होतात. ) स्वामी, बाहेर कुणी माणूस आली !

**रावसाहेब** : आली ! म्हणजे खास कुणीतरी पुरुष असला पाहिजे. बाळेकुंद्री, मालकापेक्षां तुमच्याकडेच लोकांची रहदारी जास्त दिसते आहे ! तो लेकाचा मालक तर नाहीं ना आला ? येऊं दे तर खरा. लॉज् चालवतो आहे का चेष्टा करतो आहे ! सारे चोर, दरवडेखोर भरले आहेत वाटतं खोल्यांतून ! एरवीं आमची माळ कशी गेली इथनं ? नाहीं, म्हणजे बाळे-कुंद्री तुमची गोष्ट वेगळी.

**हणमू** : काय सांगू स्वामी ! आंत आणून सोडूं काय ?

**रावसाहेब** : हनुमन्ता, जरा इकडे या बरं. असे पुढें या बरं. अन्न-पचन व्हायला वेळ लागत नाहीं ! या. इकडे या जरा.

**हणमू** : ( गोंधळून पुढें येत ) काय म्हणते रायर !

**रावसाहेब** : बघूं द्या तुमची कानटोपी ! ( हातांत घेऊन तींत कांहीं नाहीं अशी खात्री करून ) अरे वाः ! मोठी छान आहे अं ! हिंडलग्याला अशा टोप्या बघितल्या होत्या मागं.

**बाळासाहेब** : काय हिंडलगा ? अरे बाप रे !

**तारा** : इश्श ! त्यांत काय अरे बाप रे करायला झालं ? बाळेकुंद्री, अहो तिथलीच मी !

**रावसाहेब** : ( सांवरून गडबडीनें ) म्हणजे मूळचे तिकडचेच आम्ही सारे ! ऐका मंडळी. मधें बोलूं नका ! हणमन्ता ( त्याचे बंडीचे खिसे चांचपूं लागतो. हणमू गुदगुल्या झाल्यासारखें दाखवून हसूं लागतो.) बघूं दे.

**हणमू** : येन रायर ? कसली चेष्टा करते ? अरे स्वामी, आम्हांला गुदगुली होते. तूं केवढी ! मी केवढा !

**रावसाहेब** : अरे वाः रे बेवडा ! थांब, बघूं दे नीट ( हणमू 'स्वामी स्वामी एन् रायर ! ' म्हणत हंसत हंसत आंत पळून जातो. ) पाहिलंत बाळेकुंद्री, गुलामानं झडती घेऊं दिली नाहीं. हंसण्यावारी घालवलंन्. चोरांच्या खुणाच या बाळेकुंद्री !

**बाळासाहेब** : होय, मी पण बघतों आहें त्या !

**तारा** : चिऊताई, आतां कसची सांपडते ती ! सांपडण्यासाठीं का हरवली आहे ती ?

**बाळासाहेब** : तारामती, तुम्ही स्वस्थ पडा बघूं आंत. चिऊताई, चला बरं माझ्याबरोबर. बघू या वाटेंत कुठं पडली आहे का !

**तारा** : थांबा. अहो, मी तरी येतें.

**चिऊ** : नको तारामती. तुम्ही घ्या क्षणभर विश्रांति. आम्ही येतों बघून. निर्धास्त असा तुम्ही. अहो, आमच्या लॉज्मध्यें असं कांहीं होणं...

**रावसाहेब** : तुमचा लॉज् ?

**बाळासाहेब** : ( हंसण्यावारी घालवीत ) आमचा लॉज्! आमचाच नाहीं तर काय? आम्ही राहतों इथं तेव्हां आमचाच म्हणायचा तो. नाहीं का? चला चिऊताई चिचुंद्री.

**रावसाहेब** : ( हंसून ) बाळेकुंद्री ! पसंत आहे. अहो, अशीच गम्मत केली पाहिजे आयुष्यांत.

**बाळासाहेब** : कसली बुवा गम्मत ?

**रावसाहेब** : कांहीं नाहीं. आपल्या चिचुंद्रीची !

**बाळासाहेब** : अहो, यांचं आडनांव आहे तें. तुम्ही काय समजलांत ?

**रावसाहेब** : अहो, तेंच तें. जाऊं द्या. बघा कुठं माळ सांपडली आहे का. अन् हें पाहा, ते शंखशिरोमणी मालक केव्हां येणार जरा तपास करा कीं. काय धंदा करतो का नाटक कंपनी चालवतो. असं वाटतं कीं व्हा छड्या पाठीवर मारून एक मोजावी.

**चिऊ** : चला बाळासाहेब, चला. आलोंच अं आम्ही. ( असें म्हणून दोघेजण बाहेरच्या दुसऱ्या बाजूस जातात. ते गेल्यावरोबर रावसाहेब एकदम उठून रागानें बोलूं लागतात. )

**रावसाहेब** : लुच्चे ! लबाड. चोरटे. बदमाष. खात्रीनं सांगतों तारामती, आपण इथं या सोनेरी टोळीच्या जाळ्यांत सांपडलों आहोंत. हा बाळेकुंद्री अन् ती चिचुंद्री काय? बरं आहे म्हणावं बच्चंजी ! आम्हीहीं कांहीं बैलाचं दूध प्यायलेलो नाहीं. माळ घेईन तेव्हां इथून हालेन.

**तारा** : म्हणजे यांनाच का तुम्ही लबाड समजतां ? यानींच का चोरली आपली माळ ? असं कसं होईल ? आपली गैरसोय करून मालक नसतांना देखील यांनीं आपलं आदारातिथ्य केलं ते वाईट कसे असतील ?

**रावसाहेब** : आदरातिथ्य केलं ? म्हणजे आम्ही उभे होतों ते बसा म्हणाले. तुम्हांला आंतल्या खोलींत त्या भामटिणीनं नेलं ! अन् मोत्यांची माळ गडप्प ! वा रे वा आदरातिथ्य ! असं वाटतं—

**तारा** : कीं सगळ्यांना छडीनं झोडपावं. असंच ना ?

**रावसाहेब** : असंच, अगदीं असंच. तो लुच्चा माकड ! कसा वस्ताद आहे बघितलास ? कां नाहीं हो झडती घेऊं दिली त्यानं ? कर नाहीं

त्याला डर कशाला ? ( आठवून ) तारामती, या लोकांना आपली खरी हकीकत, आपण कोण कुठले हें सांगून उपयोगाचं नाहीं बरं ! वेडे, प्रवासांत वेळ पडेल तसं सावधगिरीनं वागावं लागतं.

**तारा** : खरंच का म्हणतां तुम्ही ? पण बाई मला तर कांही हीं माणसं वाईट नाहीं हो दिसत. माझ्या आईवडलांची हकीकत मी सांगायला लागलें तर बिचारीच्या डोळ्यांला पाणी आलं हो.

**रावसाहेब** : अग, खोटं तें. साफ खोटं. तिनंच ती माळ तूं रडतां रडतां पळविली असली पाहिजे. तिच्या डोळ्यांतलं खरं पाणी तूं अजून ओळखलं नाहींस. त्यांना आपली खरी हकीकत सांगूं नकोस. अन् हें बघ—

( इतक्यांत एक अगदीं तरुण नाहीं पण दिसण्यांत फार जास्त म्हातारा-ही नाहीं असा साधारण फॅशनेबल पोषाखाचा व चालण्याबोलण्यांत रुबाब असणारा असा गृहस्थ प्रवेश करतो. त्याचे हातांत फक्त हॅन्डबॅग असते. रावसाहेब चंद्रचूडांना सहजच वाटतें कीं हेच ते इतका वेळ कुठें दडी मारून बसलेले लॉज्चे मालक. यांच्याही हातांत हातमोजे. )

**रावसाहेब** : या मिस्टर !

**सरदार** : मी मिस्टर नाहीं अं ! मला सरदार म्हणून हांक मारत जा. मिस्टरचा सरदार होतो पण सरदाराचा मिस्टर होत नाहीं समजलांत ? अन् जरा बेतानं बोलायला शिका. कुणाशीं बोलतां आहांत तुम्ही ठाऊक नाहीं तुम्हांला ? ( सिगरेट शिलगावून खुर्चीवर बसून टेबलावर पाय पसरतो ).

**रावसाहेब** : या गुर्मीवरून तुम्हीच या लॉज्चे मालक दिसतांहात. इतका वेळ कोकलतों आहोंत आम्ही तुमच्या नांवान. कुठं होतांत ?

**सरदार** : ( जोरांत ) कुठं होतांत ? म्हणजे आम्हांला काहीं कामं नसतात वाटतं ?

**रावसाहेब** : पण आपलं मुख्य काम सोडून चालत नाहीं सरदारसाहेब ! लॉज्मध्यें आमच्यासारख्याची दाद कोण घेणार तुमच्यावांचून.

**सरदार** : ( अरेच्चा ! 'असं आहे काय लच्चांड ? म्हणजे इथले मालक समजतो आहे हा आपल्याला. द्या तोंड आल्या प्रसंगाला. आपल्याला काय

जगांत भिण्यासारखं उरलंय् आतां ? ' असे विचार मनांत आल्यामुळे चेहरा बदलून ) बसा. बसा तर खरे. तुमची कशी गैरसोय होऊं देईन मी असा ?

**रावसाहेब** : अहो, त्या बाळेकुंद्रीनं आंतल्या या त्याच्या खोलींत उतरण्याची परवानगी दिली म्हणून टेंकलों तरी आम्ही इथं. आम्हांला एक दोन दिवसांकरितां स्वतंत्र खोली द्या बघूं.

**सरदार** : हात्तीच्या ! एवढंच ना ? ठीक आहे. कोण आहे रे तिकडे ? राम्या ?

**तारा** : हनुमन्त गेले. आतां कोण रामचंद्र येताहेत ?

**सरदार** : अरे राम्या ! काय लेकाचे माजले आहेत. एकजण ओ देईल तर शपथ. जसे कांहीं सगळेच मालक झाले आहेत हरामखोर.

**रावसाहेब** : होतील नाहीं तर काय सोडतील ? तुम्ही बसत जा गांव ऊंडारत ! मग कां नाहीं ते शेफारणार ? किती वर्षं धंदा करतां हो हा ? असाच का चाललाय् ब्रह्मघोळ इथं ?

**सरदार** : हें काय हें बोलणं ? आज जरा चुकून थोडा वेळ बाहेर गेलों होतों म्हणून हा घोटाळा झाला. जाऊं दे. तुम्ही आपले इथंच उतरा कसे.

**तारा** : कुठं इथंच ?

**सरदार** : त्याला काय हरकत आहे ? अहो, आमच्याकडे हें अमक्याचं ते तमक्याचं असं कांहीं नाहींच मुळीं. हें आमचं ऑफिस ना. तुम्ही खुशाल तुमचं समजून चाला. माझी कांहीं हरकत नाहीं.

**रावसाहेब** : ठीक, असं स्पष्ट असलं पहिल्यापासून म्हणजे बरं. तारामती, आतां संकोच उरला नाहीं.

**सरदार** : घ्या हो थोडीं केळीं. फळं तर घ्या ! ( बॅगमधून केळीं वगैरे काढून देतो. )

**रावसाहेब** : शाब्बास. असेच जरा धोरणानं वागत जा. तुमचाच फायदा आहे त्यांत. आम्ही कुणाचं फुकट का खातों कधीं ? पण वागणुकीचं महत्त्व आहे. दुसरं काय ?

**तारा** : मालक, आंतल्या या खोलीतले ते बाळासाहेब अन् चिऊताई कोण हो ?

**सरदार** : ( हंसून ) हं ! त्या होय ? हें पहा, आपण तर कांहीं त्या गंमती तुम्हांला सांगणार नाहीं बुवा. अहो, आम्ही आपली नेमकी डोळेझांक करतों. त्यांना मीं मुळींच पाहिलं नाहीं असं समजा ना.

**रावसाहेब** : काय ? पाहिलं नाहीं ? म्हणजे तुमच्या लॉज्मध्यें खोली घेऊन ते राहातात अन् तुम्हीं त्यांना पाहिलं नाहीं ?

**सरदार** : नाहीं. पाहिलं नाहीं असं कसं होईल हो ? तसं वर वर पाह्यलंय् मीं त्यांना ! पण मला मात्र एकंदरींत प्रकरण ठीक दिसत नाहीं.

**रावसाहेब** : वाटलंच मला तसं. लागला धाग्याला धागा जमायला. तारामती, पाहिलंस ना हें लचांड ?

**तारा** : पण मला बाई अजून वाटतं कीं तीं दोघं कांहीं लबाड नाहींत. दिसायला तर आपल्यासारखींच दिसताहेत. नाहीं का हो मालक ?

**सरदार** : अहो, दिसण्यांत दिसताहेत आपल्यासारखेच सरळ ? पण आंतलं काय सांगावं कुणाचं या दिवसांत ? मी तर आपला बुवा सगळ्यांशीं जरा जपूनच वागतों. नाना तऱ्हेच्या लोकांशीं संबंध यायचा आमचा.

**तारा** : खरं आहे ग बाई अगदीं. मालक, तुम्हांला खरं सांगू का ? मघांशीं मी त्या चिऊताईबरोबर जरा आंत गेलें तर तेवढ्यांत माझ्या गळ्यांतली मोत्यांची माळ चोरीस गेली. आतां कुणाचा म्हणून कसा संशय घ्यायचा आम्हीं ?

**सरदार** : काय ? तुमची मोत्यांची माळ चोरीला गेली ? मग खात्रीनं सांगतों त्याच जोडीचं काम असलं पाहिजे हें.

**रावसाहेब** : ऐका, ऐका. आतां मालकच स्पष्ट बोलताहेत म्हणून ठीक आहे. अन् तो त्यांचा तिसरा त्यांना सामील आहे. खरं कीं नाहीं मालक ?

**सरदार** : तिसरा म्हणजे तो त्यांचा छोटा मुलगा म्हणतां ना ?

**रावसाहेब** : काय मुलगा ?

**सरदार** : म्हणजे मुलगी असेल ! मी कांहीं बुवा इतकं बारकाव्यानं बघत नाहीं.

**रावसाहेब** : मूर्खच आहांत. अहो, तो त्यांचा नोकर—

**तारा** : बिनशेपटीचा हनुमान !

**सरदार** : ( कांहीं अर्थबोध न झाल्यामुळें ) तो आपला– तो होय ! आलं ध्यानात. तो म्हणजे तसा फार हुषार आहे बरं का ! मोठा वस्ताद आहे. तिचा— तो म्हणजे नवराच आहे.

**तारा** : अग बाई ! मालक ?

**सरदार** : काय बुवा, चुकलं वाटतं कांहीं आमचं. अहो, नवरा नाहीं तर मग काय सांगू आतां तुम्हांला ?

**रावसाहेब** : सरदार, अहो तो तिचा नवरा आहे का कोण आहे कुणास ठाऊक ! पण तें तिसरं हो ? तें कांहीं कमी नाहीं म्हटलं. त्यांतलंच दिसतें आहे तें.

**सरदार** : अहो, आहेच तें तसं ! विचारूंच नका तुम्ही. तुमचंच म्हणणं बरोबर आहे. मीं हेरलं आहे तें; पण म्हटलं आपण कशाला बोला ? आम्ही उच्चार करणार नाहीं कसल्या गोष्टींचा.

**तारा** : हें पहा. चला तुम्ही बघूं आंत जरा. मला ती खोली धुंडाळूं दे एकदा. पण बाई अजून वाटतं कीं कांहीं लबाडी नसावी त्यांची.

**रावसाहेब** : तुला काय कळतंय् यांतलं ? प्रवासांत असे कितीक अनुभव येतात समजलीस ! मालक, जरा ती मंडळी बाहेर गेली आहेत. अनायासें आतां तुम्हीच इथं आहांत; तेव्हां जरा त्यांचं सामान तपासून येतों आम्ही. कांहीं हरकत नाहीं ना ?

**सरदार** : वाः ! त्यांत हरकत कशाची हो ? खुश्शाल तुम्ही त्यांचं सामान तपासा. वाटलं तर कांहीं खिशांत देखील घाला.

**तारा** : इश्श ! मालक ?

**रावसाहेब** : काय हो सरदार ?

**सरदार** : म्हणजे ? तुमची माळ सांपडली तर खिशांत घाला म्हणतों मी. दुसरं काय ? आतां बोलत नका बसूं. आटपा.

**रावसाहेब** : चल तारामती. आतां मालक समक्ष इथं आहेत. आतां

कांहीं काळजी नको. माल घेतल्याखेरीज हलायचं नाहीं इथून. असा दाखवतों त्या बाळेकुंद्रीला अन् चिचुंद्रीला तमाशा कीं देखते रहो पट्ठे ! चल.

**तारा** : चला. ( दोघें आंत जाऊं लागतात. )

**रावसाहेब** : मालक, जरा आमच्या जेवणाचं बघा बरं का ! अन् एकदां चार्ज सांगून ठेवा म्हणजे बरं.

**सरदार** : असूं द्या हो ! चार्ज काय घ्यायचाय् तुमच्यासारख्यांकडून ? जेवणाचीं दोन ताटंच मागवतों खाणावळींतनं.

**तारा** : इश्श ! म्हणजे ? हा कोरडाच का लॉज आहे ? जेवण नाहीं का मिळत इथं ? खाणावळींतनं का मागवायचीं ताटं ?

**सरदार** : बाईसाहेब, तुम्हांला आतां काय करायचंय् त्याच्याशीं ? आम्ही कुठूनही ताटं मागवूं. तुमची सोय केली म्हणजे झालं ना ! खोलीचा झाडा घ्या बघूं अगोदर. ( 'बरं आहे' म्हणून रावसाहेब व तारा आंत जातात. सरदार आपल्याशींच ऐटींत हंसतो व इकडे तिकडे रुबाबांत हिंडतो. मध्येंच आपली बॅग उघडून त्यांतला मोत्यांचा कंठा बाहेर काढून हंसतो व पुन्हां तो बॅग्मध्यें ठेवतो व बॅग् बंद करतो .व ऐटींत इकडून तिकडे हिंडूं लागतो. जणूं काय हाच इथला मालक. इतक्यांत हणमू प्रवेश करतो. )

**हणमू** : येन् री स्वामी ! आपण कोण ?

**सरदार** : ( त्याला एकदम रुबाबांत गार करण्याच्या हेतूनें ) काय म्हणतोस ? मी कोण ? लाज नाहीं वाटत भलते प्रश्न विचारायला ?

**हणमू** : ( दचकून ) अरे काय म्हणते ? रागावून कशास सोडते स्वामी ! आपण कोण म्हटलें ?

**सरदार** : चूप ! मूर्ख नाहीं तर. आमच्यासारख्या सरदारांना भलते प्रश्न विचारूं नकोस. अगदींच गांवढळ दिसतो आहेस मला. कोण रे तूं ?

**हणमू** : तूं कोण विचारले तर मी कोण पुसते ? अयय्यो ! स्वामी, आमी नोकर असते. सर्वन्ट साहेब असते आमी.

**सरदार** : काय म्हणालास सर्वन्ट साहेब ! अरे वा रे वाः साहेबा ! अरे, हा साहेब काम तरी काय करतो इथं ?

**हणमू** : ( खुशींत ) अरे स्वामी, हा सर्वन्ट साहेब सगळे कांहीं करते ! झाडून काढते. अन्ना पल्या शिजविते. चाय करते. होळगी थापडते. बाजार आणते. स्वामी भाळ छलो ! हा साहेब वाटेल ते करून सोडते. पाहून घे हवी तर !

**सरदार** : अरे हो हो ! पण नांव काय तुझं ?

**हणमू** : या साहेबास हनुमन्त, हणम्या बोलते.

**सरदार** : वारे वाः हणमू. हणमू, हें घे बक्षीस ! (त्याला पांच रुपयांची नोट देतो. ) अरे, असूं दे. अजून काय झालं ! तूं जर माझ्या मनाप्रमाणं वागलास ना तर नोटांचं बंडल बक्षीस देईन तुला. तुझ्यावर एकदम खूष झालों आहोंत आम्ही.

**हणमू** : ( एकदम मिळालेल्या बिदागीनें चीत होऊन ) सरदार, काय बोलून सोडूं. अरे, तूं आनी तर मी कत्ती. तूं कुद्री तर मी नायी. तूं बंटी तर मी हंदी. तूं गुब्बी तर मी कागी !

**सरदार** : हणमू, माफ कर ना. माझी स्तुतीच आहे ना ही सारी ?

**हणमू** : शंकाच नको. ( इतक्यांत आंतून रावसाहेब व तारा प्रवेश करतात. ) नाहीं तर ही माणूस. शीः !

**रावसाहेब** : ए बिनशेपटीच्या, कुणाला शीः करतोस ?

**हणमू** : तुला, तुला करते ! भिणार नाहीं म्हणते. हनुमन्त आहे...

**सरदार** : हणम्या, चूप ! चले जाव इथून. अगोदर फर्स्ट क्लास तीन कप चहा घेऊन ये. आटप लवकर. गिऱ्हाइकांशीं भांडण करतोस ? काढून टाकीन अशानं.

**हणमू** : अरे, काय काढते ? कुणास काढते ? काय बोलते ? अरे काय चमत्कार करते ?

**सरदार** : ( त्याच्या अंगावर आणखी पैसे फेकून ) हणमू, आटप ! कांहीं तरी बडबडूं नकोस वेड्यासारखं. चहा घेऊन ये. काय सामान लागत असेल तें नीट घेऊन ये.

**हणमू** : अरे स्वामी, तूं—

**सरदार** : शट अप् ! जातोस का नाहीं ? ( त्याच्या अंगावर धांवून जातो. तो पळून जातो. तों जातांना 'चहा आण अगोदर ' असें सरदार त्याला बजावतो. )

**तारा** : छान ! अस्सं बक्षीस पाहिजे या मेल्याला. मालक, असले कसले हो नोकर ठेवले आहेत तुम्हीं ?

**सरदार** : अहो, करायचं काय ? पदरीं पडलाय् तें पवित्र करून घ्यायला पाहिजे नाहीं का ? जगांत ज्याच्या त्याच्याशीं फटकून वागून कसं चालेल ? कांहीं लोकांना असंच चुचकारून बाळगलं पाहिजे.

**रावसाहेब** : कबूल आहे. मालक, अगदीं सगळ्यांच्या नित्याच्या अनुभवाच्या गोष्टी सांगतांहात. ऐका. मालक झालं म्हणजे अनुभवानं असं तत्त्वज्ञान आपोआप सुचूं लागतं बरं !

**सरदार** : तुम्हांला या आमच्या नोकराची आणखी गम्मत ठाऊक नाहीं. कधीं कधीं तर सरळ माझी सुद्धां ओळख विसरून जातो अन् मलाच तुम्ही कोण म्हणून दटावणीनं विचारतो. मग जरा खरपूस झाडला कीं येतो ताळ्यावर.

**तारा** : मालक, मला तर बाई आतां त्याचा चांगलाच संशय यायला लागलाय. घ्या काय ? आमची एखादी मौल्यवान जिन्नस पळवायला मागंपुढं नाहीं बघायचे असले लोक.

**सरदार** : नेम नाहीं. म्हणून इथं येणाऱ्या प्रत्येक गिऱ्हाइकाला मी नेहमीं बजावून सांगतों की बाबांनो, तुमचं कांहीं जडजोखीम असेल तर तें माझ्याजवळ द्या. त्याची पावती घ्या. जातांना परत घेऊन चला. असली सगळी जबाबदारी मी स्वतःच्या शिरावर घेत असतों. असल्या नोकरावर विसंबलों कीं कारभार आटोपलाच आमचा. तुरुंगांत जायची पाळी यायची आमच्यावर. ( हंसतो. )

**रावसाहेब** : येईल, येईल. नेम नाहीं बरं. शहाण्याचं व्हावं चाकर पण मूर्खाचा होऊं नये धनी म्हणतात ते कांहीं खोटं नाहीं. तारामती, कंठा तर हरवून बसलांत !

**तारा** : इश्श ! त्यांत एवढं टोंचून बोलायला काय झालं ? तुम्ही भय्यासारखे राखण करायला बरोबर होतांत तरी सुद्धां गेला ना ! जिन्नस जायचा म्हटला कीं तो जाणारच. आपला नव्हताच म्हणून स्वस्थ बसावं झालं.

**सरदार** : काय लागला का कांहीं खोलींत तपास ?

**तारा** : कुठं मागमूस नाहीं. अहो, सांपडण्यासाठीं का चोरानं चोरला तो ? मला नाहीं वाटत आतां परत मिळेल म्हणून.

**सरदार** : हें पाहा, तुम्हांला म्हणून सांगतों. मी जरी या लॉजचा मालक असलों तरी फावल्या वेळांत गुप्त हेरांचा चांगला अभ्यास केलाय्. मनांत आणलं तर तुमचा कंठा शोधून काढायला वेळ लागणार नाहीं मला.

**तारा** : अय्या, मालक. खरंच ?

**सरदार** : अहो, खरंच म्हणजे ? या विलासपुरांतले सारे पोलीस अधिकारी मला फार चागलं ओळखतात. नेहमीं माझी गांठ घेण्याच्या खटपटींत असतात. मी जर त्यांना जरा कुठं दिसलों नाहीं तर बिचाऱ्यांना चुटपूट लागते.

**रावसाहेब** : शाबास. मालक, अहो पोलिसांवर तुमची छाप म्हणजे कंठाचोर धराल आपोआप. पहा, कंठा मौल्यवान आहे. हुडकून काढलात तर चांगलं बक्षीस देऊं. काय तारामती ?

**तारा** : कांहीं म्हणत नाहीं तारामती.

**रावसाहेब** : आतां कशाला बोलेल तारा ? चागलं बजावलं, प्रवासांत जडजोखीम बरोबर घेऊं नको म्हणून. पण तुझी हौस उपटली ना मधेंच ! झाली हौस ?

**तारा** : इश्श ! तुम्ही काय पुरवणार माझी हौस !

**रावसाहेब** : आतां एक करतां का ? माझे आई, तेव्ढी ती बरोबर घेतलेली रक्कम अन् आंगठ्या, कुड्या, बांगड्या तेवढ्या तरी दे आतां या मालकांच्याजवळ. नाहीं तर तेहि घालवा म्हणजे मिळवलीत.

**तारा** : म्हणजे मीं का घालवला कंठा ?

**रावसाहेब** : मग कुणीं ? मीं ?

**सरदार** : हें पहा, उगाच तक्रार कशाला ? ती सारी जडजोखीम माझ्या स्वाधीन करा बघूं. ताबडतोब पावती देतों.

**तारा** : मालक, थांबा. मी बॅग् आणतें. (धांवत आंतल्या खोलींत जाते.)

**रावसाहेब** : मालक, तुम्ही तरी नीट सांभाळाल ना ? नाहीं तर करायला जावं एक अन् व्हावं भलतंच !

**सरदार** : छे हो ! रावसाहेब, आमचा लॉज् म्हणजे विश्वासाची तिजोरी आहे समजलांत ? आज इतकीं वर्षे हा धंदा करतों आहें. लाखों रुपये या हातांनीं खेळवले आहेत ते काय उगीच ? रावसाहेब इथल्या साऱ्या गिऱ्हाइकांचं जडजवाहीर मी माझं स्वतःच समजून जपत असतों बरं ! ( तारा आंतून बॅग् घेऊन येते. बॅग् मधल्या टेबलावर ठेवून उघडते. आंतील दागिने, पैसे वगैरे बांधून ठेवलेली रुमालाची पुरचुंडी सरदाराच्या हातांत देते. सरदार ती पुरचुंडी रुबाबांत घेतो. इतक्यांत हणमू तीन कप चहाचा ट्रे हातांत घेऊन प्रवेश करतो. )

**हणमू** : अरे स्वामी, चहा आणून सोडला म्हणतो. चहा पिते काय म्हणतो. ( चहाचा ट्रे टेबलावर ठेवतो. सरदार तारानें दिलेली पुरचुंडी आपल्या कंठा असलेल्या बॅग्मध्यें घालतो व ती बंद करतो. हणमू हा प्रकार कावळ्याच्या नजरेनें पाहात असतो. ) अरे स्वामी, पुरचुंडी येनरी ? या मुलगीचा पुरचुंडी तुम्ही कशास घेते ?

**रावसाहेब** : मालक, पाहिलंत ? बोक्याचं लक्ष साईवर.

**हणमू** : अरे, काय पुटपुटते तूं ?

**रावसाहेब** : तूं. गाढवा. मला अरे तुरे करतोस ?

**हणमू** : सूळिमग्रा ! मला गाढव म्हणून सोडतेस ?

**सरदार** : ( मालकाच्या रुबाबांत ) राम्या...

**हणमू** : अरे, रामा नाहीं म्हणतो. हणमू असतो.

**सरदार** : हणम्या, हा रुपाया घे. सिगारेट पाकीट लाव ! चले जाव.

**हणमू** : ( रुपाया घेत काढता पाय टाकीत ) व्यंकटरमणा ! आज तर स्वामी पैशाचा पाऊस पाडते. ( जातो. )

**सरदार** : घ्या. चला. घ्या. बसा स्वस्थ. ( सर्वजण चहा घेतात. ) थांबा, अगोदर पावती देऊं द्या. अगोदर व्यवहार मग गम्मत. ( कोपऱ्यांतल्या टेबलाजवळ जाऊन लिहीत बसतो. ) हं, रावसाहेब, आपलं नांव ?

**रावसाहेब** : रावसाहेब चंद्रचूड.

**सरदार** : ( लिहीत व मोठ्यानें वाचीत ) रावसाहेब चंद्रचूड यांचेकडून खालील जिनसा सांभाळण्यासाठीं मिळाल्या :—हं, काय काय यादी करूं ?

**तारा** : एक हजार रुपयांच्या नोटा.तीन आंगठ्या. सोन्याचा बांगड्या जोड.

**सरदार** : ( तारा नांवें सांगते. तो मोठ्यानें वाचत लिहितो. ) हं. बस्स ? एवढंच ?

**तारा** : अहो मालक, एवढंच. प्रवासाला निघालों आहोंत आम्ही म्हटलं. हें बरोबर घेतलं हेंच जास्त.

**रावसाहेब** : आलांत का ताळ्यावर ?

**तारा** : तुम्ही नको कांहीं बोलायला.

**सरदार** : छेः ! रावसाहेब, फारच करडी नजर आहे बुवा तुमची नातीवर...

**तारा** : ( आश्चर्यानें ) काय ? मी नात का काय याची ?

**सरदार** : ( चूक सुधारून ) चुकलों, नात नव्हे मुलगी !

**तारा** : अय्या ! अहो मालक, तुम्ही मला यांची मुलगी समजता कीं काय ? अहो, हें माझ्या गळ्यांतलं सोन्याचं मंगळसूत्र नाहीं का पाहिलंत ?

**सरदार** : (हंसत) अशा जिनसा आमच्या नजरेतुन कधींच सुटत नसतात.

**तारा** : अहो, असली कसली तुमची नजर ? अहो, मी यांची चांगली लग्नाची बायको आहें बायको !

**सरदार** : ( आश्चर्याच्या आवाजांत ) काय बायको ?

**तारा** : बायको, बायको, बायको ! पहिली नाहीं, दुसरी नाहीं, चांगली सहावी बायको आहें !

**रावसाहेब** : अहो मालक, या भानगडींत तुम्हांला शिरून काय करायचंय् ? आमची आतां जरा नीट सोय लावा. त्रास झाला येऊन आम्हांला. मासळीबाजारांत सांपडल्यासारखं डोकं उठून गेलं ! जा तारामती, जरा

आंत जाऊन पड. मी थोडी चक्कर मारून येतों. मालक, तेवढं आमचं नीट सांभाळा अं !

**सरदार** : रावसाहेब, तुम्ही आतां त्या जिनसा साफ विसरून जा. अगदीं निर्धास्त रहा. त्या माझ्या आहेत असंच समजून चालतों मी !

**तारा** : पडतें बाई मी आंत जाऊन जरा. ऐकलं का ! बाहेर जातांच आहांत, एक अमृतांजनाची बाटली तरी घेऊन या.

**सरदार** : अमृतांजन ! आमच्या लॉज्मधल्या गिऱ्हाइकांची सर्व सोय आम्ही पाहात असतों. ( हणमू सिगारेट पाकीट घेऊन येतो. सरदार तें घेतो. हणमूच्या अंगावर पांचाची आणखी एक नोट फेकतो. ) राम्या...

**हणमू** : स्वामी, रामचंद्र नसतो ! हणमू असतो.

**सरदार** : अरे, राम्या काय अन् हणम्या काय ! बिनडोक्याला कोणत्याहि नांवानं हांक मारली तर बिघडलं कुठं ? जा, एक अमृतांजनाची बाटली विकत घेऊन ये.

**हणमू** : काय अमृतांजन ? काय भानगड स्वामी ही ?

**सरदार** : कांहीं भानगड नाहीं. जा, डोक्यावर चोळायचं असतं तें ?

**हणमू** : अय्यो ! चोळ चावली काय कीं का कुणाला ?

**रावसाहेब** : ( काठी उगारत ) अरे रामा रामा रामा.

**हणमू** : ( चिडून ) अरे सुळिमग्ना, रामा नव्हे ही, हणमू असते.

**सरदार** : ( ओरडून ) हणम्या, भागो जलदी, एक बॉटल् अमृतांजन. जाव. ( पैशाच्या दातृत्वानें दडपलेला हणमू नोटेकडे पहात मिटक्या मारीत पळून जातो. त्याच्या मागोमाग रावसाहेब धांदलीनें जातात.) मिसेस चंद्रचूड, आपण पडा आंत स्वस्थ.

**तारा** : छे ! पडलंच पाहिजे मला थोडा वेळ. टाळक्याची पवनचक्की होऊन गेली आहे. ( जाते. )

( सरदार आपल्या बॅगमधून एक फोटो काढतो. सिगारेट शिलगावून ऐटींत खुर्चीवर बसून फोटोकडे टक लावून पाहात विचारांत गर्क होऊन जातो. तेवढयांत बाळासाहेब बाळेकुंद्री प्रवेश करतात. )

**सरदार** : ( रुबाबांत ) या. आलांत ?

**बाळासाहेब** : आलों.

**सरदार** : कोण पाहिजे तुम्हांला ?

**बाळासाहेब** : म्हणजे ? अहो, मीच मालक आहे इथला. तुम्ही कोण?

**सरदार** : ( सांवरून ) शूः शूः ! जरा हळू बोला. अहो, तुम्ही इथले मालक आहांत हें न समजण्याइतका मी दुधखुळा नाहीं. हें पहा मालक, मला ओळखत नाहीं तुम्ही ?

**बाळासाहेब** : ( गांगरून ) नाहीं बुवा. नाहीं ओळखलं !

**सरदार** : ( जास्त रुबाबांत ) मला ओळखलं नाहींत तुम्हीं ? अहो, या शहरांत रहाणाऱ्याला मी कोण हें ठाऊक नसावं म्हणजे मूर्खपणाची कमाल आहे. ( दरडावून ) कोण समजलांत मला तुम्ही ? ( बाळासाहेबांचा चेहरा पडतो.) मला कांहीं भामटा, उचल्या, समजलांत का काय ?

**बाळासाहेब** : साहेब, मला कांहींच समजत नाहीं हो. कोण आपण ?

**सरदार** : शूः ! मोठ्यानं बोलूं नका. या माझ्या एकंदर रुबाबावरून तुम्हांला कळायला हवं होतं मी कोण तें. इकडे या. कान करा इकडे. ( बाळासाहेब जवळ जाऊन आपला कान पुढें करतो. सरदार त्याच्या कानाला हात लावून कांहीं सांगतात–जणूं महा भयंकर गुपीतच ते ऐकवीत आहेत. इतक्यांत हणमू प्रवेश करतो. )

**हणमू** : ( रागांत ) रायरु ? काय करते ? मालकाची कान पडकते ? गळा दाबून सोडूं काय म्हणते ? सोड कान.

**बाळासाहेब** : (त्याला थांबवीत. गांगरलेल्या आवाजांत) अरे ए हणमन्ता, असं काय करतोस ? अरे, पोलिसचे साहेब आहेत हे. आपल्या लॉज्मध्यें चोर शिरला आहे म्हणतात.

**हणमू** : ( किंचाळत ) अय्यो ! चोर शिरली ? कुठें शिरली ? कशी शिरली ? धरून सोडूं काय म्हणतो.

**सरदार** : ( अधिकारी आवाजांत ) शट् अप् ए राम्या...

**हणमू** : साहेब, हनुमंत असतो मी... अमृतांजन घेऊन सोड म्हणतो.

**सरदार** : ( पाकीट घेत ) मालक, आतां इथं कुणी नवा पाहुणा आलाय् का तुमच्याकडे ?

**बाळासाहेब** : हो. आलाय्.

**सरदार** : असे हातमोजे (आपल्या हातांतले हातमोजे दाखवीत) आहेत का त्याच्या हाताला?

**बाळासाहेब** : आहेत. आहेत. तरी मला वाटलंच.

**सरदार** : अन् एखादी पोरगी आणली आहे का बरोबर ?

**हणमू** : होय रे स्वामी. छोटी पोरगा असतो.

**सरदार** : आं? पोरगा ?

**बाळासाहेब** : नाहीं. नाहीं. मुलगीच आहे. हा अप्पा पोरीचा जिभेनं पोरगा करतो.

**सरदार** : (हंसतो.) चांगलं करतो.

**हणमू** (हंसत) स्वामी, दोड्ड गंम्मत. हा हनुमंत फार चांगली असतो. चोर नसतो. मला पकडूं नको म्हणतो.

**सरदार** : मालक, सारं बरोबर हेरलंय् मीं. कोणची खोली दिली आहे त्याला ?

**बाळासाहेब** : ही आंतली.

**सरदार** : ठीक आहे. हणमू, खोलींत डोकावून बघ बरं आंत कोण कोण आहे तें.

**हणमू** : (हळू हळू पुढें जाऊन दारांतून आंतल्या खोलींत डोकावून पुन्हां हळू हळू हळू परत येतो.) स्वामी, पोरगा निजली. ढाराढूर. बुररर फुस्स्स् करतो. तो म्हातारी...आंत नसतो. बाहेर जाऊन सोडली दिसतो.

**सरदार** : अस्सं. मग मालक, आतां वेळ गमावून चालणार नाहीं. तोच तो बँक् लुटारू आहे हें नक्की. त्याला पकडल्याखेरीज येथून मला हालतां येणार नाहीं. मला इथंच थांबलं पाहिजे. (जरा विचार करून) हें पहा मालक, तुम्ही आणि हणमू दोघेजण खालीं लॉज्च्या दारांत उभे रहा. तो लांबून दिसला कीं मला नुसती 'साहेब' म्हणून हांक मारा. कीं मी आलोंच. हें पाह्यलंत् का माझ्याजवळ काय आहे तें? (बॅग्मधून एक रिव्हॉल्व्हर काढून हातांत घेतो. हणमू तें पाहून 'अय्यो! तोफ उडतो. गोळी झाडते. स्वामी, घाम फुटते,' असें घाबरून बडबडतो. सरदार त्याला चूप म्हणून दटावतो.) हं. आटपा लवकर. दारापाशीं दबा धरून उभे राहा.

मालक, या तुमच्या मदतीबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. बक्षिसाच्या रकमेंतली कांहीं रक्कम आम्ही खुषीनें तुम्हाला देऊं. चला आटपा.

( हणमू व बाळासाहेब धांदलीनें जातात. सरदार आणखी एक डाव सहज जिंकला अशा आविर्भावात इकडे तिकडे हिंडतो व पुन्हां थोड्या वेळापूर्वींच बॅगमधून काढलेला फोटो हातात घेऊन त्याच्याकडे पाहात बसतो. इतक्यांत चिऊ प्रवेश करते )

**चिऊ** : बाळासाहेब... अग बाई ! आपण कोण ?

( सरदार तिच्याकडे पाहतांच विस्मयचकित होतो व एकदम घाईनें फोटो बॅग्मध्यें घालतो. त्या धांदलींत त्याच्या तोंडांतली सिगारेट गळून खालीं पडते. )

**सरदार** : ( अडखळत ) आपण...आपण कोण इथल्या ?

**चिऊ** : मी इथली व्यवस्थापिका आहें. मालक बाळासाहेब बाळेकुंद्री भेटले आपल्याला ?

**सरदार** : भेटले.

**चिऊ** : आपण गेस्ट म्हणून आलांत ना ?

**सरदार** : नाहीं...हो !...गेस्ट म्हणूनच आलों थोडा वेळ बसून जेवण करून जाणार आहें.

**चिऊ** : छान ! हें ठीक. कारण मघाशींच एका जोडप्याला ती आंतली ऑफिस्ची खोली दिली. आमच्या लॉज्मध्यें पाहुण्याची फार गर्दी असते अलीकडे. बसा कीं ! चहा मागवूं का ?

**सरदार** : (खुर्चीवर कोसळत) नको. कांहीं नको.

**चिऊ** : (टेबलावरचे कागदपत्र नीटनेटके ठेवीत) तास झाला. आजचा हिशेब लिहायचा तसाच राह्यलाय्. हीं सारीं कामं वेळेला झालेलीं बरीं. ( रजिस्टरें चाळू लागते. )

**सरदार** : आपण इथं नोकरी करतां ?

**चिऊ** : ( रजिस्टरमध्यें पाहत ) जवळ जवळ तसंच.

**सरदार** : म्हणजे ?

**चिऊ** : अहो, मी इथंच राहातें.

**सरदार** : म्हणजे ?

**चिऊ** : अहो, या लॉज्च्या मालकांची म्हणजे बाळासाहेब बाळेकुंद्रींची आणि माझी फार जुनी ओळख आहे.

**सरदार** : म्हणजे ?

**चिऊ** : अहो, माझ्या वडिलांच्या ओळखीचे आहेत ते !

**सरदार** : तुमचे वडील ? वडील आहेत तुम्हांला ?

**चिऊ** : ( रजिस्टर हलकेच मिटत तन्मयतेनें ) माझे वडील ! वडील नाहींत मला. बरींच वर्षं झालीं, ते मला सोडून गेले. अगदीं जिव्हारीं घाव बसला होता त्यांच्या...

**सरदार** : ( कांपऱ्या आवाजांत ) म्हणजे ?

**चिऊ** : त्यांना एका बदमाषानं फसवलं होतं हो !

**सरदार** : म्हणजे ?

**चिऊ** : काय सांगूं तुम्हांला ? कशाला ऐकतां तुम्ही ? माझी कर्मकहाणी ऐकण्यासारखी नाहीं.

**सरदार** : ( आर्जवी स्वरांत ) मला कोणी परका समजूं नका तुम्ही· अनोळखी पाहुण्याच्या नात्यानं जरी मी इथं आलों असलों तरी माझ्या हृदयांतली माणुसकी कांहीं अजिबात नाहींशी झालेली नाहीं. कुणीं फसवलं तुमच्या वडलांना ?

**चिऊ** : अहो, तो कुणी दरोडेखोर, चोर, डाकू होता. माझ्या वडलांना तें कांहीं अगोदर समजलं नाहीं. एक दोन मध्यस्थ गांठून त्यांनीं माझ्या वडलांना भुरळ पाडली. आम्ही गरीब होतों. माझी आई मी एक वर्षाची असतांनाच देवाघरीं गेली. तेव्हांपासून नाना खस्ता खाऊन माझ्या दीन दुर्दैवी सालस भोळ्या वडलांनीं माझा सांभाळ करून मला वाढवली. त्याच्याबरोबर माझं लग्न लावून देण्याबद्दल त्या बदमाषानं माझ्या वडलांचं मन वळवलं. माझ्या गरीब वडलांना त्यांनीं त्यासाठीं बरीचशी रक्कमहि दिलेली होती. अग बाई, पण हें काय मी बरळत सुटलें ? हें पहा पाहुणे, क्षमा करा अं. माझ्या पूर्वायुष्याचा तो विषय निघाला कीं असं कांहीं वाटेल त्याच्यापुढें बोलून जातें मी.

मन गांगरून जातं. मेंदू गोंधळून जातो माझा. ऐकणाऱ्याला त्याची कल्पनाहि येणार नाहीं.

**सरदार** : ( आर्जवी हळू आवाजांत ) ज्याच्याबरोबर तुमचं लग्न लागलं त्याला कधी बघितलंहि नाहींत तुम्हीं ?

**चिऊ** : अहो, आमचा लग्नाचा सोहळा गपचीप उरकण्यांत आला. अक्षता डोक्यावर पडल्या तोंच पोलिसांची गाडी तिथं येऊन थडकली. त्यानीं सरळ त्या बदमाषाला पकडून नेला. तेव्हांपासून त्याचा पत्ता नाहीं.

**सरदार** : ( गहिंवरून ) तुमच्या वडलांचं काय झालं पुढं ?

**चिऊ** : ' पोरी, मीं तुझा गळा कापला. पोरी, मी खुनी आहें. पोरी, मला क्षमा कर ' असं म्हणतां म्हणतां दिवसेंदिवस ते चंदनासारखे झिजू लागले. शेवटीं ते वेड्यासारखं करू लागले. ' बदमाष, बेइमान ' असं किंचाळूं लागले. अन् शेवटीं या जगात मला एकटीला टाकून ते देवाघरीं निघून गेले. ( स्फुंदून डोळे पुसू लागते. )

**सरदार** : किती भयकर गुन्हा हा !

**चिऊ** : ( चिडून ) फार भयंकर. खुनापेक्षांहि भयंकर. माझ्याशीं अशा फसवणुकीनं लग्न लावण्यापेक्षां त्यानं सरळ माझ्या मानेवरून सुरी फिरवून माझा गळा कापून टाकला असता तर किती किती चांगलं झालं असतं. किती डोंगराएवढे उपकार झाले असते माझ्यावर. पण हें सुवासिनीचं वैधव्य ! नको रे देवा ! असा भयंकर प्रसंग कुणाहि अबलेवर आणूं नकोस.

**सरदार** : ( पुटपुटतो. ) सुवासिनीचं वैधव्य ! सुवासिनीचं वैधव्य ! !

**चिऊ** : सुवासिनीचं वैधव्य ! शृंखला नसून जखडबंद. जिवंत असून मेलेली. कुणींही लाथाडावी. कुणींही घाणेरड्या कल्पनांनीं विटाळून टाकावी. अशी मळवट भरल्या पांढऱ्या कपाळाची, जिवंत नवऱ्याची विधवा बायको !

**सरदार** : नका. असं चमत्कारिक बोलूं नका. तुमच्या पिळवटलेल्या हृदयांतून बाहेर पडणारा हा एकेक शब्द माझ्या काळजाचे तुकडे तुकडे करून टाकीत आहे.

**चिऊ** : म्हणजे ? तुम्हांला या अनुभवाची काय कल्पना ?

**सरदार** : काय सांगूं तुम्हांला ? कसं सागूं तुम्हांला ? जगांत आतां मला तोंड उघडण्याची मुभा राहिली नाहीं. किती भयंकर पातकी मी ! केवढा भयंकर गुन्हेगार मी. तुरुंगाच्या कोठडींत डांबून, चाबकाचे फटकारे मारून शरिरांतून रक्ताच्या चिळकांड्या उडवल्या तरी सुद्धा ज्या गुन्ह्याचं पुरेपूर शासन होऊं शकणार नाहीं असा घोर गुन्हा माझ्या हातुन घडला आहे.

**चिऊ** : गुन्हा ? तुम्ही गुन्हेगार ? कोणता गुन्हा केलात तुम्हीं ?

**सरदार** : चोरी, दरवडा, खून या फौजदारी कायद्यांनीं ठरवलेल्या साऱ्या मामुली गुन्ह्यांपेक्षांहि फार भयंकर असा गुन्हा ! रामशास्त्र्यांच्या न्यायनिष्ठुर कडव्या वाणीनं उच्चारलेल्या शिक्षेहूनही जास्त भयकर शिक्षा ज्या गुन्ह्याला किंचित् शोभून दिसेल असा गुन्हा मीं केला आहे.

**चिऊ** : अग बाई ! पाहुणे, भावनेच्या भरांत भलतंच बोलून गेलें मी. त्याचा इतका का परिणाम झाला तुमच्यावर ?

**सरदार** : माझ्यावर आजपर्यंत कोणत्याच घटनेचा कांहींएक परिणाम होऊं शकत नव्हता. माझं हृदय फत्तरालाही लाजवणारं होत. पण जिवंत स्त्रीच्या मरणप्राय जीवनाच्या दृश्याचा महाभयंकर घाव त्याला सहन करतां येत नाहीं. मी वाटेल तो गुन्हा बेशक करीन आणि त्याबद्दल मला कधीं पश्चात्तापहि होणार नाहीं. पण दुबळ्या, अजाण जिवाचा क्षणाक्षणाला जिवंत सत्यानाश करण्याचं माझ्या हातून घडलेलं कृत्य माझ्या हृदयाला सहन करतां येत नाहीं.

**चिऊ** : म्हणजे ? कोण आहांत तुम्ही ?

( इतक्यांत आंतून ‘ साहेब, साहेब ’ अशा आरोळ्या व रावसाहेब चंद्रचूडांचा आणि बाळासाहेब बाळेकुंद्रींच्या आरडाओरडा ऐकूं येतो. चिऊ ‘ अग बाई ! हा कसला गोंधळ ? ’ असे उद्गार काढीत बाहेर जाते. सरदार रिव्हॉल्व्हर हातांत घेऊन उचलतो. इतक्यात बाळासाहेब व हणमू रावसाहेबांना धक्के मारीत पुढें आणतात. ते ओरडत असतात. मागोमाग चिऊ येते. आंतून तारामती ‘ अग बाई चाललाय् काय हा गोंधळ ’ असें ओरडत बाहेर येते. )

**बाळासाहेब** : साहेब, हा पहा पकडला गुलामाला.

**रावसाहेब** : ए गधड्या. मला पकडतोस ? मला धक्के मारतोस ? मालक, अगोदर या बदमाषाला पकडा.

**हणमू** : अरे सूळीमग्ना ? ब्यांक चोरलीस. उलट बोंब मारते. साहेब याला पकडून सोड म्हणते.

**चिऊ** : काय चालवलंय् तुम्हीं हें ?

**तारा** : अग बाई ! यांना कां धरलं ? काय केलं यांनीं ? या वयांत कसल्या भानगडी केल्या यानीं ?

**सरदार** : ( पुन्हा रुबाबांत ) सोडा बघूं अगोदर त्यांना. मंडळी, सगळे गपाचिप उभे रहा. कुणी कांहीं बोलूं नका. जर कुणीं कांहीं गडबड केली तर या पिस्तुलांतली गोळी घालीन एकेकाला !

**हणमू** : अरे स्वामी !

**सरदार** : ( रिव्हॉल्व्हर रोखून ) चूप !

( सगळे गपचीप उभे राहतात. )

**सरदार** : मंडळी हें पाहा, मी कोण हें अजून कुणींच ओळखलं नाहीं. अहो, मी जादुगार आहें जादुगार.

**सर्व** : काय ? जादुगार ?

**सरदार** : होय जादुगार ! सगळे गपाचिप उभे रहा. आतां तुम्हांला थोड्या गंमती दाखवतों ! (मधोमध उभा राहून आपली बॅग हातांत घेतो.) हं, रावसाहेब चद्रचूड, हे घ्या परत तुम्हीं दिलेले दागिने आणि रोकड ! नीट मोजून घ्या.

**रावसाहेब** : ( माल तपासून ) मिळाले. सगळे बरोबर परत मिळाले. पण मालक, अहो परत कां करतां हे ?

**सरदार** : चूप ! गप्प बसा. आतां कोणी मधें कांहीं बोलूं नका. हं, तारामती, तुमची मोत्यांची माळ हरवली होती ना ? ( बॅगमधून माळ काढतो. ) ही घ्या तुमची माळ.

**तारा** : ( माळ घेऊन आनंदानें नाचत आपल्या गळ्यांत घालते. ) अय्या, कुठं सांपडली ही मालक तुम्हांला ? किती बाई चांगले आहांत तुम्ही !

**सरदार** : बोलूं नका कुणी. हणमू, ह्या घे तुला शंभराच्या नोटा बक्षीस ! ( नोटा देतो. )

**हणमू** : (आनंदानें उड्या मारीत) स्वामी भाळ छलो! व्यंकटरमणा...

**सरदार** : अहो, खरे मालक बाळासाहेब. तुमच्यावर आम्ही बेहद्द खूष आहोंत. आमची आठवण म्हणून हे पांचशें रुपये ठेवा तुमच्याजवळ. घ्या ! (नोटा देतो. )

**रावसाहेब** : अरे वाः ! नोटांचा पाऊस पडतोय आज इथं ! पण अहो जादुगार, या जादूच्या तर नोटा नाहींत ना ? पांच दहा मिनिटांनीं रंग नाहींसा होऊन पांढऱ्या तर नाहींत ना होणार ?

**सरदार** : जगांतला चांगुलपणा अजून कांहीं सगळाच निकालांत निघालला नाहीं याची तुम्हाला लवकरच खात्री पटेल. जरा थांबा. ( गंभीर आवाजांत ) चिऊताई, मला क्षमा करा. माझ्या हातून असा भयंकर गुन्हा घडला आहे कीं, त्याचं प्रायश्चित्त माझं मलाच देणं भाग आहे. कायद्याच्या पुस्तकांत असल्या गुन्ह्यांना शिक्षा करण्याची तरतूद अजून झाली नाहीं. हे घ्या एक हजार रुपये.

**चिऊ** : ( आश्चर्यानें ) काय ? एक हजार ?

**सरदार** : होय. एक हजार. घ्या हे. मला एवढी भीक घाला. घ्या हे. ( चिऊ थरथरत्या हातानें त्या नोटा घेते. ) आतां आणखी एक जादू अं मंडळी ! हा पाहा मी एक फोटो इथं टेबलावर असा झांकून ठेवतों. मीं या पिस्तुलाची गोळी झाडून बार उडवला कीं हा फोटो तुम्ही मंडळी जरूर पाहा, अन् त्याच्या मागचा मजकूर पण वाचा.

**बाळासाहेब** : कुणाचा आहे तो ? कुणाचं पत्र ?

**सरदार** : चूप. खेळ खलास होत आला आमचा. (कांपऱ्या आवाजांत) परमेश्वरा, पृथ्वीवरच्या कृत्रिम कायद्यानं मी गुन्हेगार असलों तरी मी मुर्दाड अंतःकरणाचा नाहीं. देवा, या साऱ्यांना सुखी कर. चिऊताई, तुम्हांला फसवणारा दुष्ट लांडगा मेला असं कळल्यावर तुम्ही या बाळासाहेबांच्या बरोबर आनंदानं पुनर्विवाह लावून सुखी व्हा अशी माझी तुम्हांला नम्र विनवणी आहे. ( सर्वजण गंभीर होतात. )

**चिऊ** : पण तुम्ही खरे आहांत तरी कोण?

**सरदार** : मी कोण? मी बदमाष. मी चोर. अजाण बालिकेचा गळा कापणारा मी. मी कोण? ( वेड्यासारखा हंसतो. ) मी सज्जन बदमाष. हा पहा माझा हात. हा पहा माझा हातमोजा. अन् ही पहा... ( हातमोजा हळू हळू काढतो व पंजाची बाहेरची बाजू करंगळी आंतील बाजूस मुडपून सर्वांना दाखवतो. नाटकांतील करंगळी तुटल्याच्या दृश्यासाठीं अशी सोय करावयाची ) ही पहा माझी तुटकी करंगळी !

**सर्वजण** : अरे बाप रे ! ( आश्चर्यचकित होतात. )

**सरदार** : ( ओरडून ऐटींत ) गुड् बाय मंडळी. नमस्ते ! जादू खलास. एक... दोन... तीन... ( बॅग घेऊन एकदम पळून जातो. सर्वजण चार दोन क्षण तसेच स्तब्ध राहतात. नतर चिऊ हलकेच पुढें जाऊन फोटो हातांत घेते व एकदम आश्चर्यानें—)

**चिऊ** : अग बाई, माझाच फोटो हा लहानपणचा. अन् मागल्या बाजूला हें माझ्या वडलांचच अक्षर. ( पत्र वाचूं लागते. )

श्री. बाबूराव यांस... आपणांकडून माझ्या मुलीसाठीं झालेली मागणी समजली. मध्यस्थांमार्फत मला पांचशें रुपये तुम्हीं दिल्यास मी माझ्या मुलीचें तुमच्याशीं लग्न लावण्यास तयार आहें. तिच्याच फोटोमागें हें पत्र लिहून पाठवीत आहें. आपला—

( इतक्यांत बाहेरून पिस्तुलाची गोळी झाडल्याचा मोठा बार व "अरे अरे भररस्त्यांत आत्महत्या करून पडला बिचारा" असा गोंगाट ऐकूं येकूं येतो. सर्वजण खिडकीजवळ जातात. बाळासाहेब बाळेकुंद्री मोठ्यानें म्हणतात... "तोच तो जादूगार सरदार आत्महत्या करून मेला बिचारा." बाहेरचा गोंगाट वाढूं लागतो. हळू हळू पडदा पडतो. वन्दे मातरम्चे सूर ऐकूं येतात. )



# मनोहर ग्रंथमालेचीं प्रकाशनें



**कुमारी कल्पना चित्रे आणि इतर गोष्टी**
लेखक : श्रीधर देशपांडे — किंमत ३ रुपये

**झुंजुमुंजु (कथासंग्रह)**
लेखिका : योगिनी जोगळेकर — किंमत २॥ रुपये

**घरंदाज (नाटक)**
लेखक : प्रा. ना. बा. पराडकर — किंमत १। रुपया

**विज्ञान विहार (शास्त्रीय लेखसंग्रह)**
लेखक : डॉ. श्री. द. लिमये — किंमत २॥ रुपये

**विमान फिरतें अधांतरीं**
लेखक : सदानंद चेंदवणकर — किंमत १२ आणे

**झुंज**
लेखक : शं. गो. साठे — किंमत ३ रुपये

**मराठियेचिया नगरीं (विनोदी एकांकिका)**
लेखक : शं. गो. साठे — किंमत ६ आणे

**मनोहर ग्रंथमाला : टिळक रोड, पुणें २**

## श्री. गो. ल. आपटे, बी.ए., एल्‌एल्‌.बी., यांचीं

# प्रकाशित पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| आपत्त्याचीं पानें (विनोदी काव्यसंग्रह) | ... ... ... | १२ आणे |
| पर्वतीवरून पुणें (काव्यसंग्रह) | ... ... ... ... ... | ८ आणे |
| स्वर्गाच्या दारांत (काव्य) | ... ... ... ... ... | ८ आणे |
| सरला बाला (काव्य) | ... ... ... ... ... ... | ८ आणे |
| खरा सत्यशोधक (कादंबरी) | ... ... ... ... ... | १ रुपया |
| सोनेरी नागीण (कादंबरी) | ... ... ... ... ... | १ रुपया |
| सैतानी कत्तल (कादंबरी) | ... ... ... ... ... | १ रुपया |
| गारगोटी (कादंबरी) | ... ... ... ... ... ... | १ रुपया |
| विचित्र वाटमारी (कथासंग्रह) | ... ... ... ... ... | १। रुपया |
| आंबेमोहोर (कथासंग्रह) | ... ... ... ... ... ... | ५ रुपये |
| सोनचांफ्याचीं फुलें (कथासंग्रह) | ... ... ... ... | २ रुपये |
| बगलबच्चा (नाटक) | ... ... ... ... ... ... ... | १ रुपया |
| देहू रोड (नाटक) | ... ... ... ... ... ... ... | १ रुपया |
| उपटसुंभ (विनोदी नाटिका) | ... ... ... ... ... | १ रुपया |
| ब्रह्मघोळ ( ,, ) | ... ... ... ... ... ... | १० आणे |
| सोशल क्लब नाट्य सं. मं. (६० वर्षांचा इतिहास) | ... | १ रुपया |

**पुढील प्रकाशन :**

चतुर्भुज ( नाटक )

बिल्वपत्रें ( कथासंग्रह )

फरासखाना ( कादंबरी )

प्रकाशक : मनोहर म. केळकर, मनोहर ग्रंथमाला, १९६/८५ टिळक रस्ता, पुणें २
मुद्रक : द. कृ. काकनूरकर, प्रकाश मुद्रणालय, ३९५/४ सदाशिव पेठ, पुणें २